या पुस्तकांत मुख्यतः समावेश झाला आहे. या लेखांचें ऐतिहासिक महत्त्व काय आहे हें लेखांस जोडलेल्या टीका किंवा प्रस्तावना यांवरून अभ्यासूंस कळून येण्यासारखें असतें तरी अस्सल कागदांचें सामान्यतः महत्त्व व त्या दृष्टीनें या संग्रहांतील कागदांचें वैशिष्ट्य येथें सांगणें अवश्य आहे म्हणून तसें करतों.

इतिहासाच्या साधनांत उत्तरकालीन साधनांपेक्षां समकालीन साधनांची किंमत जास्त समजली जाते व समकालीन साधनांतही रचित ग्रंथांपेक्षां अस्सल पत्रव्यवहार, राजकीय हुकूम इत्यादींना जास्त महत्त्व आहे. रचित ग्रंथांमध्यें, ते ग्रंथ हेतुपुरस्सर रचले जात असल्यानें वस्तुस्थिति लपविणें, तिचा विपर्यास करणें, माहिती अपुरी असणें, इत्यादि दोष कळून वा न कळून शिरत असतात व यामुळें समकालीन ग्रंथही सत्य माहितीच्या बाबतींत प्रमाणभूत ठरूं शकत नाहींत. या उलट समकालीन कागदपत्र हे इतिहास लिहिण्याच्या उद्देशानें लिहिलेले नसतात. त्यांचा मुख्य उद्देश इच्छिलेलें काम होऊन यावें हा असतो. यामुळें त्यांतील भाषा असंदिग्ध, निश्चित, जोरदार अशी असते. अर्थात् तीवरून लेखकाचा हेतु, निर्दिष्ट काम वगैरे समजण्यास अडचण पडत नाहीं. म्हणून आजकाल सर्व देशांत अशा समकालीन कागदपत्रांना इतिहासाचें साधन म्हणून फार महत्त्व दिलें जातें.

या दृष्टीनें हिंदुस्थानाच्या इतिहासाकडे पाहिलें तर त्याचे दोन भाग पडतील. एक मुसलमानपूर्वकालीन व दुसरा अर्वाचीन. पैकीं मुसलमानपूर्वकालीन इतिहास समजण्याचें मुख्य साधन समकालीन शिलालेख ताम्रपट व नाणीं हें होय. समकालीन वाङ्मय त्यावेळच्या इतिहासास उपयोगी पडत असलें तरी त्यावेळच्या इतिहासाचा अभ्यास करणारे विद्वान अशा वाङ्मयाची वास्तविक किंमत ओळखत असल्यानें त्यास त्या साधनांमध्यें मुख्य स्थान देण्याची चूक त्यांचे हातून होत नाहीं.

अर्वाचीन कालाच्या इतिहासाची गोष्ट तशी नाहीं. त्या कालाविषयीं माहिती देणारे समकालीन व उत्तरकालीन रचित ग्रंथ मिळतात. या ग्रंथांतून अतिशय विस्तृत व तपशीलवार माहिती दिलेली असते. त्यामुळें पुष्कळ विद्वानांचा देखील असा भ्रम झालेला आहे कीं, या ग्रंथांवरून जी माहिती मिळते ती प्रमाणभूत मानावयास हरकत नाहीं. पण ज्यांनीं ज्यांनीं हे ग्रंथ सूक्ष्मपणें वाचले आहेत त्यांस कळून चुकलें आहे कीं, रचित ग्रंथ पश्चात्कालीन असोत वा समकालीन असोत त्यांच्या माहितीवर विश्वास ठेवण्याची सोय नाहीं. त्यांनीं अनेक प्रकारच्या चुका अजाणतेपणें किंवा जाणून बुजून करून ठेवल्या आहेत. फेरिस्ताचेंच उदाहरण घ्याना. यानें हिंदुस्थानचा भला मोठा इतिहास हि. १०१२ च्या सुमारास लिहून संपविला. हि. ९३२ मध्यें बहामनी कुलाची इतिश्री झाली. पण सुमारें ७५ वर्षांनंतर बहामनी कुलाचा, दक्षिणेंत कित्येक वर्षें राजाश्रयानें राहून, इतिहास लिहि-

गाऱ्या केरिस्ताला त्या कुळांतील शेवटच्या तख्तनशीन बादशहा जो कलीमउल्ला त्याच्या तख्तनशीन बापाचें नांव ठाऊक असूं नये हें आश्चर्य नव्हे काय ! फेरिस्त्यानें कलीमउल्लाच्या भावालाच त्याचा बाप बनविला आहे. जवळ जवळ समकालीन इतिहासांत जर अशा ढोबळ चुकवा तर पूर्वकालीन इतिहासांत किती चुका असतील बरें !

समकालीन व दरबारी इतिहासकार प्रामाणिकपणें इतिहास लिहीत असें म्हणावें तर तेंही दिसत नाहीं. आलमगीरनामा औरंगजेबाच्या पहिल्या दहा वर्षांची हकीकत देतो. लेखक दरबारचा अखबारनवीस होता. त्यानें शायस्तेखान पुण्याकडे आला असतां त्याच्या कांहीं हालचालींची रोजची हकीकत दिलेली आहे. अशा लेखकानें शिवाजीनें शायस्तेखानावर छापा घातल्याची हकीकत मुळींच सांगूं नये हें आश्चर्य नव्हे काय !

शिवाय मुसलमानी इतिहासकारांनीं मुसलमानी राज्यांत हिंदूंनीं केलेल्या कामगिरीचे उल्लेख त्यांच्या नांवानें करण्याचें जाणून बुजून किंवा अजाणतेपणीं टाळल्याचें दिसतें. उदाहरणार्थ मुधोळचे घोरपडे घराणें घ्या. या घराण्यांतील लोकांनीं बहामनी व आदिलशाही रियासतींत अतिशय महत्त्वाची कामगिरी बजाविली आहे, हें त्यांस मिळालेल्या फर्मानांवरूनच सिद्ध होतें. असें असतां फेरिस्त्यानें एकापेक्षां अधिक ठिकाणीं त्यांचा उल्लेख करूं नये हें कृत्रिम दिसत नाहीं काय ?

जी गोष्ट मुसलमानी इतिहासकार व दरबारी लेखक यांची तीच मराठी बखरकारांची. मुसलमानी इतिहासकारांनीं सुलतानांना लाजिरवाण्या किंवा स्वतःस नापसंत अशा गोष्टी गाळल्या तर बखरकारांनीं अभिमानास्पद अशा हकीकतीही गाळलेल्या दिसून येतात. मग त्या जाणून बुजून असोत किंवा अजाणता असोत. शिवाजीनें सुरतेवर दोन वेळां स्वाऱ्या केल्या हें कांहीं बखरकारांना ठाऊक नाहीं. श. १५७१ सालीं विजापूरच्या सुलतानानें शहाजीस कैद केलें असतां शिवाजीनें शिरवळच्या विजापुरी अंमलदाराशीं लढाई केली ही गोष्ट तरी बखरकारांना कोठें माहीत होती ! येवढेंच काय पण शिवाजीचा जन्म केव्हां झाला हें तरी बखरकारांना नीट कोठें ज्ञात होतें !

तात्पर्य, मुसलमानी इतिहासकार अथवा दरबारी लेखक काय किंवा मराठी बखरकार काय, दोघांच्याही हातून इतिहासांत अक्षम्य चुका झाल्या आहेत. म्हणून या इतिहास समजण्यास समकालीन कागदपत्रांची अतिशय जरूरी आहे.

असें असतें तरी मुसलमानपूर्वकालीन इतिहासाचे अभ्यासक समकालीन साधनें जमविण्याचा व प्रकाशित करण्याचा जसा यत्न करतात तसा अर्वाचीन कालाच्या इतिहासाचे अभ्यासक करतात कीं नाहीं याविषयीं शंका आहे.

महाराष्ट्रांत साधनें प्रकाशित करण्याविषयीं चाललेला सरकारी अथवा बिन-सरकारी प्रयत्न आणि एपिग्राफिया इंडो–मॉस्लेमिका या सरकारी नियतकालिका-तर्फे चाललेला प्रयत्न हे जर सोडून दिले तर हिंदुस्तानच्या इतर भागांत अर्वाचीन इतिहासाला उपयुक्त अशीं समकालीन साधनें प्रसिद्ध करण्याची कोणी जोराची खटपट करीत असल्याचें दिसत नाहीं. याचा परिणाम असा झाला आहे कीं, सोळाव्या शतकापूर्वीचे कागदपत्र हातांच्या बोटांवर मोजण्याइतके थोडे प्रसिद्ध झाले आहेत. कोणी म्हणतील कीं, त्यावेळचे कागदपत्र सांपडत नसले तर कसे प्रसिद्ध होणार ? पण हें म्हणणें खरें नसल्याचें मुधोळच्या घोरपडे घराण्यांतील कागद-पत्रांवरून किंवा रॉयल एशियाटिक सोसायटी व तिच्या शाखा यांच्या नियतकालि-कांत अथवा इतरत्र प्रसिद्ध झालेल्या थोड्या बहुत कागदपत्रांवरून म्हणतां येतें.

असो. कोणत्याही कारणानें का होईना इतर प्रांतांतून, अर्वाचीन इतिहासाला उपयुक्त अशीं अव्वल दर्जाचीं साधनें प्रसिद्ध होत नसलीं तरी महाराष्ट्रांत ती स्थिति नाहीं. येथें आज कित्येक वर्षे मूळ अव्वल दर्जाचीं समकालीन साधनें प्रसिद्ध करण्याचा उपक्रम चालू आहे. आणि त्यायोगें इतिहासात विलक्षण बदल होत आहे. तो इतका कीं, श्री. रा. सा. गो. स. सरदेसाई यांनीं मराठी रियासतीचा इतिहास शेवटास नेला नाहीं तोंच त्याची सुधारलेली आवृत्ती काढणें जरूर झालें आहे.

पण महाराष्ट्रांतील संशोधकांनीं मराठी साधनें प्रसिद्ध करण्याच्या बाबतींत जितकी तळमळ दाखविली तितकी फारसी साधनांच्या बाबतींत दाखविली नाहीं. वास्तविक अर्वाचीन इतिहासांत व मुसलमानी अमदानींत फारसीस मोठें महत्त्व असल्यानें अनेक तऱ्हेचा महत्त्वाचा पत्रव्यवहार फारसीमधून झाला असला पाहिजे. म्हणून फारसी-कडे संशोधकांनीं अतिशय लक्ष द्यावयास पाहिजे होतें. पण तसें तें दिलें गेलें नाहीं. त्याचा परिणाम असा झाला कीं, जीं साधनें कांहीं दिवसांपूर्वी मिळणें सहज शक्य होतें तींच आतां दुर्मिळ झालीं आहेत येवढेंच नव्हे तर त्यांपैकीं कित्येक नाहींशींही झालीं असतील. या दृष्टीनें मंडळानें पूर्वी प्रसिद्ध केलेल्या फारसी पत्रव्यवहार या पुस्तकाचें किंवा प्रस्तुत खंडाचें महत्त्व अतिशय आहे.

मात्र ही केवळ सुरवात आहे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. अशा प्रकारचीं हजारों फर्मानें व शेकडों शिलालेख जेव्हां प्रसिद्ध होतील तेव्हांच आपणांस विश्वसनीय उपयुक्त सामुग्री मिळाली असें होईल. या बाबतींत इतर देशांत झालेल्या उद्योगाकडे पाहिलें तर आपले उद्योग त्याच्या पासंगासही पुरणार नाहींत इतके क्षुद्र वाटतात. फ्रान्समध्यें १८१९ ते १८२९ दरम्यान साधनांचे कमींत कमी १३५ ग्रंथ बाहेर पडले. तसेंच १८३४ मध्यें गॅझेट याच्या अध्यक्षत्वाखालीं निघालेल्या संस्थे-मधून १५० साधनग्रंथ बाहेर पडले आणि ग्यूझोनें स्थापलेल्या

आतापर्यंत ३३० साधन ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत.' इंग्लंडमध्यें १८५७ मध्यें स्टेशनरी ऑफिसनें कॅलेंडर्स ऑफ स्टेट पेपर्स ही माला प्रसिद्ध करण्यास सुरवात केली आणि त्याचवर्षी ' रोल्स सीरीज ' सुरू होऊन तींत १८९६ पर्यंत २४: असल साधनांचे ग्रंथ प्रसिद्ध झाले. शिवाय १८६९ सालीं स्थापन झालेलें हिस्टॉरिकल मॅन्युस्क्रिप्ट्स् कमिशन अजूनही साधनांचे खंड प्रसिद्ध करीत आहे. यासेरीज माइन ( Migne ) नें १८४६–१८६४ त्या-दरम्यान धार्मिक इतिहासाला उपयुक्त असे ३८१ साधनग्रंथ प्रसिद्ध केले. जर्मनीनेंही साधनांचे ग्रंथ प्रसिद्ध करण्याच्या बाबतींत अशीच बहुमोल कामगिरी केली आहे. पण हे सर्व प्रयत्न निव्वळ सरकारी होते. यांतच खाजगी प्रयत्नानें प्रसिद्ध झालेले ग्रंथ जमेस धरले तर मला वाटतें कीं, आमच्या हिंदुस्थानाच्या पुष्कळ पटीनें लहान असलेल्या प्रत्येक देशानें आपल्या इतिहासाला उपयुक्त अशा साधनांचे कमींत कमी १००० ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. त्या मानानें आमचे प्रयत्न फारच अल्प प्रमाणावर नाहींत काय !

आमचे येरेचसे प्रयत्न खाजगी स्वरूपाचे आहेत हें खरें आहे. आम्ही सामान्य लोक दारिद्र्यांत बुडून गेलों आहों हेंही नाकबूल नाहीं. साधन ग्रंथ छापणें धंद्याचे दृष्टीनें फायदेशीर होत नाहीं म्हणून सामान्य प्रकाशक असलीं पुस्तकें छापीत नाहींत हेंही खोटें नाहीं. पण हें सर्वांचेंच काम आहे. विशेषतः ज्यांचा इतिहास प्रकाशांत आणण्याचा प्रयत्न होत आहे त्या सरदार, जागीरदार, राजेरजवाडे यांनीं, या बाबतींत हलगर्जीपणा जास्त लक्ष घालून अतिशय सढळ हातानें मदत करावी हें त्यांचें कर्तव्य आहे. या नवयुगांत त्यांच्यामध्येंही जागृति होत आहे. तिचा परिणाम त्यांचें लक्ष पूर्वजांच्या इतिहासाकडे जोरानें वेधण्यांत होईल असीं सुचिन्हें दिसत आहेत. प्रकाशकांची गोष्टही तशीच आहे. एकही प्रकाशक आज गरीब स्थितींत सांपडणार नाही. त्यांना सुस्थितींत आणण्यास लेखकच बहुतांशीं कारणीभूत झालेले असतात. मग त्यांनीं उतराई होऊं नये काय !

अस्सल साधनांच्या महत्त्वाविषयीं येवढें सामान्य विवरण केल्यावर या संग्रांतील कागदांचें वैशिष्ट्य येथें थोडक्यांत दाखवितों. ले. ३ हा माझ्या मतें फारुकी कागद आहे. मला वाटतें अजूनपर्यंत इंग्रजी अथवा इतर नियतकालिकांत कोठेंही फारुकी फर्मानें एकही प्रसिद्ध झालेलें नाहीं. या दृष्टीनें या कागदास निःसंशय महत्व आहेच. पण त्या शिवाय या कागदांत तारखेचा जो उल्लेख आहे त्यावरून आपणांस सुहूर सनाच्या एका नवीन प्रकाराची माहिती मिळत आहे. या कागदावरून फारुकी सुलतानही हिंदू प्रजेपासून जिझियापट्टी वसूल करीत ही नवीन गोष्ट समजत आहे. ले. ६१ ते ६६ यांचीही अशीच गोष्ट आहे. महाराष्ट्रीय संशोधकांस कुतुबशाही फर्मानांचें स्वरूप माहीत होतें असें वाटत नाहीं. इंग्रजींत दोन ठिकाणीं कुतुबशाही फर्मानें छापल्याचें माझ्या लक्षांत आहे, पण एके ठिकाणीं तें शिलेवर खोदलें अस-

त्यानें कागदांवरील फर्मानांचें तेंच स्वरूप होतें अशी कोणाची कल्पना होत नव्हती व दुसऱ्या ठिकाणच्या फर्मानास मोगली हें नांव देऊन चुकीची समजूत करून घेतली आहे. वरील लेखांवरून कुतुबशाही फर्मानाचें वास्तविक स्वरूप समजण्यास मदत होते. त्यामध्यें आलेली माहितीही नवीन असल्यानें इतिहासांत जास्त भर पडत आहे. ले. ६३ मध्यें कुतुबशाही सेनापतित्व कर्नाटकचा सुभेदार व सरलश्कर मुसाखान यांजकडून काढून मिया मुश्क यास केव्हां दिलें याची तारीख दिली आहे. तसेंच अलूर पालमपेठच्या गढीवर घसरा केल्याची नवीन हकीकत ले. ६५ वरून समजते.

पण या घोरपडे घराण्यांतील फर्मानांचें आणखी एका निराळ्या दृष्टीनेंही महत्व आहे. ले. ६० मध्यें बेरोजगारांवर लढाईस जाण्याचा उपाय सांगितला आहे. त्यावरून त्यावेळीं लढाई हा किती महत्वाचा धंदा गणला जात असे हें स्पष्ट होतें. घोरपडे घराण्यांतील लोक रोजगारासाठीं ज्याप्रमाणें आदिलशाहींत लढाईच्या कामावर जात त्याप्रमाणें कांहीं घोरपडे मंडळी कुतुबशाहींत जाऊन तेथें आपणास कार्यक्षेत्र मिळवीत. येवढेंच नव्हे तर तेथें मोठ्या इतमामानें राहतां यावें अशा तऱ्हेनें कार्य करून दाखवीत. घोरपडे घराण्यांतील लोकांप्रमाणें महाराष्ट्रांतील इतर कुलांतील लोकही याच मार्गांचें आक्रमण करीत असावेत याला भोसले घराणेंही साक्ष आहे. आज महाराष्ट्रांतील लोक सर्व हिंदुस्थानभर पसरलेले दिसतात. वरवर पाहणारास मराठ्यांचा हा प्रसार पेशवाईंत झाला असें वाटण्याचा संभव आहे. पण माझ्या दृष्टीनें तर या प्रसाराची सुरवात शहाजीच्या पूर्वींच्या काळांत झाली असली पाहिजे. प्रसिद्ध राक्षस तागडीच्या लढाईंत दोन्ही पक्षांच्या सैन्यांत मराठे वीर होते असें दाखवून देतां येईल.

अस्सल कागद नवीन माहिती कशी देतात याची आणखीही उदाहरणें आहेत. ले. ४८ मध्यें शहाजी विजापुरी दरबारांतून निर्वासित झाल्याची व त्याचा मुतालीक दादाजी कोंडदेव हा कोंढाण्याच्या बाजूस असून त्यास दफे करण्यासाठीं याजी व खंडोजी घोरपडे यास पाठविल्याची हकीकत आहे. शहाजीवर विजापुर दरबारची गैरमर्जी एकापेक्षां अधिक वेळा झाल्याचें आपणास माहीत आहे. पण या लेखांत सांगितलेल्या वेळीं म्हणजे श. १५६६ मध्यें शहाजीवर गैरमर्जी झाल्यामुळें त्याजकडील जागीर हिसकावून घेण्याचा प्रयत्न झाल्याचें कोणत्याही ठिकाणीं सांगितलेलें नाहीं. तेव्हां या लेखांतील प्रसंग नवीन आहे असें मानण्याशिवाय गत्यंतर नाहीं. ले. ४० व ले. ४३ हे श. १५५९ आषाढ व श. १५६० वैशाख या वेळचे आहेत. पहिल्यांत रोहिडा किल्ला घेऊन हरामखोरांना दफे करण्याबद्दल व दुसऱ्यांत किल्ल्यांजवळ जाऊन तेथून ———ला हल्ले न देण्याबद्दल सांगितलें आहे. या दोन लेखांवरून श. १५५९ व श. १५६० या दोन सालांत रोहिडा किल्ल्याजवळ कांहीं

गडबड चालली होती हें खास ठरतें. ग्रंथांतरीं या गडबडीचा उल्लेखही नाहीं. येथें उल्लेख आहे. पण स्पष्ट नामनिर्देश नसल्यामुळें या गडबडीची निश्चित माहिती होत नाहीं हें खरें असलें तरी नवीन प्रसंग ज्ञात होतो हें नाकबूल करतां येणार नाहीं.

मुसलमानी तवारिखांमधून प्रायः अपयशाच्या प्रसंगांची माहिती गाळलेली असते हें या संग्रहांतील कांहीं फर्मानांवरून दाखवून देतां येईल. उदाहरणार्थ ले. १६ व ले. १७ हीं दोन फर्मानें पहा. यांत अंबरखान व झुंजारराव घाटगे यांना बाळापुरला शत्रूनें हैराण केलें आहे तेव्हां तुम्ही तेथें जाऊन शत्रूला दक्के करावें व पोशाजंगमानास मदत करावी म्हणून सांगितलें आहे. तेव्हां बाळापूरच्या बाजूस युद्धाला चांगलें तोंड लागलें होतें हें स्पष्ट आहे. पण मुहम्मदनाम्यांत या गोष्टीचा उल्लेख नाहीं.

राजकीय बाबींप्रमाणें धार्मिक व सामाजिक बाबींवरही प्रकाश पाडणारे लेख या खंडांत आहेत. नमुना म्हणून त्यांचें येथें दिग्दर्शन करणें अस्थानीं होणार नाहीं.

ले. ८१ मध्यें मीर मुहम्मद इमान यानें मी परमेश्वरी प्रसादामुळें तीस व तीन देवालयें मोडून मशीदीचा पाया घातला असें सांगितलें आहे. पुष्कळ लोक असें म्हणतात कीं, जुन्या मुसलमानी ऐतिहासिक ग्रंथांतून हिंदूंच्या धर्मभावना दुखविणाऱ्या देवळें मोडणें, मूर्ती फोडणें, जबरीनें बाटविणें, स्त्रिया पळविणें इत्यादि गोष्टी मुसलमानी राजांनीं केल्याबद्दल ज्या हकीकती आहेत त्या वस्तुस्थितिनिदर्शक नसून ग्रंथकारांच्या मनच्या कल्पना आहेत. उदा. या लेखाच्या टीपेंत मी उल्लेखिलेल्या धार येथील लेखासंबंधीं त्याचे संपादक म्हणतात कीं, या लेखांत सांगितलेली हकीकत खरोखरच घडली कीं नाहीं याविषयीं शंका आहे. कारण या लेखांत उल्लेखिलेला भोज कोणता हें निश्चित ठरवितां येत नाहीं. कांहीं ठिकाणीं ग्रंथकारांनीं आपल्या कोत्या कल्पना वर्ण्य पुरुषाच्या नांवावर दडपल्या नसतील असें म्हणवत नाहीं किंवा कांहीं ठिकाणीं ग्रंथकारांनीं अतिशयोक्तीचीं वर्णनें केलीं नसतील असा निर्वाळा देतां येत नाहीं. तरीही वरच्यासारख्या लेखांतून दिलेली कबुली पाहिली म्हणजे देवळें पाडणें व मशीदी उभारणें असें विनाशक व विधायक दोन्ही प्रकारचें कार्य करण्यांत पराक्रमी होणें हें परमेश्वराच्या कृपेचें लक्षण आहे असें कांहीं मुसलमान लोक समजत होते येवढें मात्र निश्चित ठरतें. ही त्यांची समजूत कोणत्या धर्मग्रंथांतील कोणत्या उपदेशावर अधिष्ठित झाली होती याशीं आम्हाला कांहीं कर्तव्य नाहीं. या लेखावरून तत्कालीं ही समजूत प्रचलित होती येवढें मात्र सांगतां येतें.

ले. १८ व ले. २१ लेख राजा व प्रजा यांचे संबंध कसे होते या विषयीं कांहीं कल्पना आणून देण्याच्या दृष्टीनें महत्त्वाचे आहेत. पहिल्यांत बादशहानें लाच घेणाऱ्या माणसांना तंबी पोचविण्याबद्दल लिहून सांगितलें असून दुसऱ्यांत साय-गांव येथील शेतकरी सरकारी पैसा भरणा न करतां आपली हद्द सोडून सातारा जिल्ह्याच्या हद्दींत गेले असतां त्यांवर साताऱ्याच्या हवालदारानें केलेल्या जुलुमाबद्दल त्याची खरड काढलेली आहे. ब्रिटिशपूर्वकालाविषयीं आपली समजूत सामान्यतः अशी आहे कीं, तो काळ अंदाधुंदी जुलूमजबरदस्ती वगैरेंनीं भरलेला होता. पण हीं पत्रें स्पष्ट दाखवितात कीं, त्यावेळीं राजा व प्रजा यांचे संबंध जिव्हाळ्याचे असून प्रजेवर जर अधिकारी जुलूम करूं लागले व त्यांत प्रजेकडे थोडी चूक असली तरी राजा प्रजेची बाजू घेऊन भांडण सामोपचारानें पण अधिकाऱ्यांचा निषेध करून मिटविण्याचा प्रयत्न करी.

एवंच या संग्रहांतील पुष्कळसे साधनें आपापल्यापरीनें अतिशय बोधप्रद अशींच आहेत. पण त्या सर्वांविषयीं येथें विवेचन करूं लागलों तर विस्तार होईल. तेव्हां मला सूत्ररूपानें येवढेंच सांगावेंसें वाटतें कीं, समकालीन अस्सल पत्रव्यवहार अनेक दृष्टींनीं महत्त्वाचा असल्यानें तो प्रसिद्धीस आणण्यासाठीं इतिहासाभ्यासी लोकांनीं अश्रांत परिश्रम केले पाहिजेत व जाणत्या लोकांनीं सढळ हातानें द्रव्याची मदत केली पाहिजे.

ज्येष्ठ शुद्ध १।१८५६ } संपादक.

# अनुक्रमणिका

## लिप्यंतराची पद्धत.*

| | |
|---|---|
| अ = ا किंवा ' | त = ت |
| अ = ع | त = ط |
| ई = ی | द = د |
| ऊ = و | न = ن |
| ए, ऐ = ی | प = پ |
| ओ, औ = و | फ = ف |
| क = ک | ब = ب |
| क़ = ق | म = م |
| ख़ = خ | य = ی |
| ग = گ | र = ر |
| ग़ = غ | ल = ل |
| च = چ | व = و |
| ज = ج | श = ش |
| ज़ = ذ | स = س |
| ज़ = ض | स = ص |
| ज़ = ظ | स़ = ث |
| झ = ز दंत्य तालव्य | ह = ه |
| झ़ = ژ | ह़ = ح |

### शुद्धिपत्र

| पृ. | ओ. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४ | १५ | गुशायद | कुशायद |
| ५ | १७ | हमद्दा अक्षदर | हमद् अक्ष |
| २१ | ६ | धर्मशाळा | एक मजली घर |
| २४ | २ | वेढा घातला | हैराण केलें |
| ५० | १० | श. १५६७ | श. १५६६ |
| ५० | ११ | इ. १६४५ | इ. १६४४ |
| ६६ | | टीप काढून टाकावी. | |
| ७३ | २२ | हगरस | जगरस |
| ७६ | ६ | शेतगांव | कुळाचा ओढा |
| ९५ | १७ | फत्तेसाठीं | फत्तेमुळें |

* या पुस्तकांतील पहिल्या चाळीस पानांतील लिप्यंतर थोडें निराळें आहे. त्यांत ह़ = ه, झ़ = ژ, ज़ = ظ,ض,ذ, स़ = ث व ص अशी पद्धत ठेविली होती. पण पुढें मुद्रकांनीं वरील पद्धतीचें थोडें जास्त खात्रीदायक लिप्यंतर हीं जुळविण्याचें कबूल केल्यामुळें वरील लिप्यंतर चालूं केलें.

# ऐतिहासिक फारसी साहित्य खंड १ ला

## १ काटी येथील फारसी शिलालेख (हि.१०१२)

( श्री. ग. ह. खरे )

*प्रस्तुत शिलालेख मला काटी ( तुळजापूर-उस्मानाबाद) येथें मिळाला. काटी येथें दोन्हीकडे दोन मनोरे असलेली एक सुंदर भव्य मशीद आहे. सबंध मशीद उत्तम काळ्या दगडाची बांधली आहे. मशीदीतील फरसबंदी पटांगण ओलांडून व पायऱ्या चढून वर प्रार्थनेच्या जागेंत गेलें असतां उत्तर व दक्षिण अशा दोन्ही बाजूंच्या भिंतींना दोन कमानी आहेत. त्या कमानींत शाईनें लिहिलेले दोन लेख आहेत. पैकीं उत्तरेच्या बाजूच्या कमानींतील तांबड्या शाईनें लिहिलेला लेख अगदीं पुसून गेला आहे; पण दक्षिणेकडील कमानींतील काळ्या शाईनें लिहिलेला प्रस्तुत लेख बहुतेक स्पष्ट आहे. त्याचा छाप घेणें शक्य नसल्यानें मी तो उतरून आणिला आहे; याच प्रार्थनेच्या जागेंत पश्चिमेकडील भिंतींत असलेल्या कमानींपैकीं मधल्या कमानींत अक्षरें खोदलीं आहेत. पण तीं सर्व बिस्मिल्लाहरहमनुर्रहीम, नादे अली वगैरे मंत्र आहेत; म्हणून त्यांचे छाप घेण्याच्या भरीस पडलों नाहीं. या लेखाच्या४ कविताबद्ध ओळी असून त्याची भाषा फारसी आहे. दुसऱ्या ओळींतील ४ था शब्द मला बरोबर लिहितां आला नाहीं. यामुळें तो व त्याच्या पुढचा अशा दोन्ही शब्दांचे अर्थ लागत नाहींत. असो; लेखाचें वाचन येणेंप्रमाणें:—

( १ ) इमारतहाए आली साख्त बी ऐब

( २ ) इमान शाह बुर्हान रोखदर ( ? ) नैब

( ३ ) बिना कर्दास्त मस्जिद् मुजह याकूत

( ४ ) नदा आमद वै तारीख अज गैब

* पा. स. १६।१८५२

अर्थ

उत्कृष्ट व निर्दोष इमारती केल्या,
बुन्हाण शहाच्या कालांत;
याकूताच्या नायकोनें मशीद बनविली.
'गुत्त' ( या शब्दां )तून तारखेचा आवाज आला.

४ थ्या ओळींत अब्जद पद्धतीनें तारीख सांगितली आहे. या संबंध ओळीचा अर्थ 'गैब या शब्दापासून ( तून ) तारखेचा आवाज आला' असा आहे. अर्थात् अब्जद पद्धतीनें हिशेब करतांना गैब या शब्दाची किंमत काढली म्हणजे आपणास लेखांत आलेली तारीख मिळेल.

गैब या शब्दाची किंमत १०१२ही येते. (गैन=१०००+ये=१०+बे=२) अर्थात् वर केलेल्या अर्थाप्रमाणें ही मशीद हि. १०१२ या सालीं बांधली गेली असें होईल. हि. १०१२ म्हणजे श. १५२५ ते २६ ( इ. स. १६०३ जून ११ ते १६०४ मे ३० ) हा काल येतो. या वेळीं निजाम शाही तख्तावर बहादूर निजामशहा हा होता. बुन्हानशाह म्हणजे दुसरा बुन्हाणशहा असें धरलें तर तो श. १५१३ ते १७ या अवधींत गादीवर होता. म्हणजे श. १५२५ या वर्षी त्याची कारकीर्द संपून गेली होती. तेव्हां बुन्हाणशहाची कारकीर्द व श. १५२५ हीं एकत्र येऊं शकत नाहींत. मेळ बसवावयाचाच तर असा अर्थ केला पाहिजे कीं, या मशीदी-पैकीं कांहीं भाग बुन्हान शाह याच्या कारकीर्दीत तयार झाला व कांहीं भाग हि. १०१२ मध्यें तयार झाला. याशिवाय इतर तन्हेनें या दोन्ही गोष्टींचा मेळ बसूं शकत नाहीं.

---

## २ सज्जनगड येथील फारसी शिलालेख

( श्री. ग. ह. खरे )

*सज्जनगड ऊर्फ परळीचा किल्ला येथें ३ फारसी लेख आहेत. त्यांपैकीं आग्नेयीस असलेल्या मशीदीच्या दर्शनी मधल्या कमानीच्या उजव्या अंगास एक लेख असावा असें वाटतें. पण सध्यां तो अगदीं अस्पष्ट होऊन गेला आहे. दुसरा एक लेख गडावर येत असतांना दुसऱ्या वेशीच्या

* [illegible] ३१।३८५२

माथ्यावर आहे. हा लेख पुढें केव्हां तरी वाचीन. आज आपल्यापुढें, या वेशींतून वर आलें असतां उजव्या अंगास तटाच्या भिंतींत जो लेख बसविला आहे तो मांडीत आहे.

या लेखाच्या दगडाची लांबी व रुंदी अनुक्रमें १'–१०॥" व १'–४॥" असून सभोंवतीं सुमारें १ इंच जागा सोडून मध्यें उठावाच्या पद्धतीनें हा लेख खोदला आहे. दगड काळा व घोटीव आहे. लेखाचे ६ भाग असून डाव्या अंगास ३ व उजव्या अंगास ३ असे डुकालमी स्वरूपांत आहेत. प्रत्येक भागाभोंवतीं नक्षीचें वेष्टन असून तीमुळें लेखास सौंदर्य आलें आहे.

लेखांतील मजकूर नस्खी पद्धतीनें लिहिला असल्यामुळें सामान्य मजकुरापेक्षां हा वाचणें बरेंच कठिण आहे. या पद्धतीविषयीं कोणास फारशी माहिती नसल्यामुळें तिजविषयीं येथें थोडी माहिती देतों. फारसी किंवा अरबी लेख दोन तीन पद्धतींनीं लिहिलेले असतात. पहिली कूफिक पद्धत. हीमधील अक्षरांचें वळण पहलवी शब्द ज्या लिपींत लिहिले जातात त्या लिपीच्या धर्तीवर आहे. ह्या लिपींत लिहिलेले लेख हिंदुस्थानांत फारसे नाहींत. यांतील अक्षरावयवांत कोनांचें बाहुल्य दिसतें. दुसरी किंवा सामान्य पद्धत, म्हणजे संस्कृत किंवा मराठी या भाषांप्रमाणें जो मजकूर लिहावयाचा तद्दर्शक वर्ण एकापुढें एक क्रमानें लिहावयाचे. हिला 'नस्तअलिक' पद्धत म्हणतात. या पद्धतींत अक्षरें पसरट म्हणजे उंचीच्या मानानें लांबी जास्त अशीं असतात. तिसरी पद्धत म्हणजे नस्खी स्वरूपांत लेख लिहावयाचे. यांत जीं अक्षरें एकमेकांस जोडून लिहिण्याचा संप्रदाय आहे तेवढींच जोडून लिहावयाचीं. बाकीचीं अक्षरें मन मानेल तेथें ठेवून द्यावयाचीं किंवा कोणतींही अक्षरें कोठेंही ठेऊन कोणत्या तरी अक्षरांत अडकवून द्यावयाचीं असतात. कोणत्याही अक्षरांचे नुक्ते कोठेही ठेवलेले असतात येवढेंच नव्हे तर एकाद्या वाक्यांतील नुक्तेवाल्या अक्षरांच्या नुक्त्यांची जेवढी बेरीज भरावयास पाहिजे तेवढी बहुधा भरत नसल्यानें कित्येक नुक्त्यांचा संबंध दोन दोन अक्षरांशीं घ्यावा लागतो. यांतील अक्षरें उंचट व गोटोळीं अशीं असतात.

अशा अस्ताव्यस्त कोरलेल्या अक्षरांतून किंवा अक्षरसंघांतून लेख लिहिणाऱ्याच्या मनांत जो अर्थ असतो तो काढावयाचा असतो. या पद्ध-

तीला उत्तम दृष्टांत द्यावयाचा तर किंडरगार्टन पद्धतींतील, कापलेल्या चित्रांच्या किंवा कोरलेल्या अक्षरांच्या ठोकळ्यांचा देतां येईल. त्या ठोकळ्यांपासून मनांत योजिलेलें चित्र किंवा धरलेला शब्द तयार करावयाचा असतो. पण तेथें कोणती वस्तू किंवा कोणता शब्द बनवावयाचा असतो हें आपणास सांगितलेलें किंवा आपण योजिलेलें असतें. येथें वरील तिसऱ्या प्रकारचे लेख वाचतांना विस्करलेल्या अक्षरांतून सर्वोत्कृष्ट असा अर्थ काढावयाचा असल्यामुळें असले लेख वाचणें कठिण असतें. या लेखाविषयीं सांगावयाचें तर मी, मंडळाचे मुनशी व प्रो. वर्मा यांचे प्रत्येकीं ७।८ तास खर्च झाल्यावर लेख लागला आहे. अजूनही १।२ ठिकाणीं शंका येत आहेच; पण मुख्य भाग नीट लागल्यामुळें लेख पुढें मांडण्यास हरकत नाहीं.

वाचन.

( १ ) दौलत अज़ दरत हमहरा रूए नुमायद
( २ ) हिम्मत अज़ कार ऊ हमह नुग्बार* गुशायद
( ३ ) तू क़ब्लह व मर हाजतमन्द हाजती
( ४ ) हाजत हमहरा अज़ दर क़ब्लह बर आयद
( ५ ) बिनाए दर्वाज़ह इमारत क़िलअ परेली आमिर शुद बतारीख ३*
( ६ ) दर जमादीउल्आखिर कार कर्द रेहान् आदिलशाही

अर्थ

( १ ) ऐश्वर्य तुझ्या दारांतून सर्वांना तोंड दाखवीत आहे.
( २ ) हिम्मत त्याच्या कामामुळें ( काम झाल्यामुळें) सर्व फुलांना प्रफुल्लित करीत आहे.
( ३ ) तूं विवंचना दूर होण्याचें स्थान आहेस. परंतु पुन्हां विवंचनायुक्त आहेस.
( ४ ) तुझ्यापासून सर्व विवंचना दूर होतात.

---

* याविषयीं शंका आहे.

(५ व ६) परेली किल्ल्याच्या इमारतीच्या दरवाजाचा पाया, ३ जमादिलाखर या तारखेस तयार झाला. आदिलशाही रेहान यानें काम केलें.

यांत जमादिलाखर हें महिन्याचें नांव स्पष्ट आहे. तारीख दाखविणारा ३ हा आंकडा आहे कीं नाहीं याविषयीं शंका आहे. पण तो स्पष्ट आहे असें धरलें तरी सालाचा उल्लेख नसल्यामुळें कोणतें सालीं दरवाजाच्या पायाचें काम झालें हें समजत नाहीं. रेहान आदिलशाही यानें काम केलें हें स्पष्ट आहे. २ऱ्या इब्राहीम आदिलशहाच्या पूर्वी रेहानचा उल्लेख आढळत नाहीं. मुहम्मद आदिलशहाच्या कारकीर्दींत २ रेहान आढळतात. एक सीदी रेहान व दुसरा मलिक रेहान. या दोहोंपैकीं कोणता रेहान येथें विवक्षित आहे हें ठरवावयाचें आहे.

---

# ३ रावेर येथील राजे देशमूख यांचीं पत्रें

(श्री. ग. ह. खरे)

*प्रस्तुतचे १०।१२ कागद सरदार आबासाहेब मुजुमदार यांनीं रावेर येथील राजे देशमुखांकडून आणले. या कागदांपैकीं २ कागद महत्त्वाचे आहेत. १ ला कागद खानदेशच्या फरुकी सुलतानांचा आहे. हा कागद अनेक दृष्टींनीं महत्वाचा आहे. फरुकी सुलतानांचा एकही कागद अजून माझ्या व इतिहासमंडळाच्याही पहाण्यांत आला नसावा असें वाटतें. यामुळें त्याचें थोडें वर्णन पुढें देतों. कागदाच्या दोन्ही बाजूंस थोडी जागा मोकळी सोडली आहे. मध्यें लेखन केलें आहे. तसेंच आरंभाची १/३ जागा मोकळी सोडून नंतर शिक्का व लेखन केलें आहे. हू, अलीफ वगैरे प्रारंभनिदर्शक अक्षर नाहीं. शिक्का बदामी आकाराचा आहे. शिक्यांत मात्र कांहीं मजकूर आहे. फारसीखालीं फारसीचा हिंदी तर्जुमा दिला असून पाठीमागें अधिकाऱ्यांचे ३ शेरे व २ शिके आहेत. कागदाचा रंग पिवळसर आहे. कागद साधारणप्रतीचा व पातळ असा आहे. हें झालें कागदाचें बाह्यवर्णन; कागदाचें अंतरंग तर याहूनही सुंदर आहे. कागदांतील व्यक्तिविशेष, जिझिया माफी व तारीख या सर्वांचें विवेचन करणें जरूर आहे. नागरी लेखना-

---

* १८ वें संमेलन.

विषयीं बोलावयाचें तर म्हणतां येईल कीं, अ हिंदी अ प्रमाणें आहे. ई मोडी ई प्रमाणें आहे. च चें स्वरूप बाळबोध व मोडी यांमधील आहे. मी चें स्वरूप पहाण्यासारखें आहे. र बद्दल सर्वत्र प लिहिला आहे. फो या प्रत्ययाबद्दल सुं हा प्रत्यय लाविला आहे. ऱ्हस्व इकार व दीर्घ ऊकार कोठेंही नाहीं. यावरून हिंदी लेखकाचा मोडीशीं फारच परिचय असावा असें वाटतें. येवढेंच नव्हे तर मीर ( ओ. ५ ) शब्द स्पष्ट मोडी वळणावर लिहिलेला आहे. परवान्याच्या शेवटीं असलेल्या ३ शेऱ्यांपैकीं २ शेरेही मोडींत आहेत हें पाहण्यासारखें आहे.

हें पत्र फरूकी सुलतानांचें आहे असें म्हणण्याचीं कारणें पुढील प्रमाणें:— ( १ ) याचें बाह्य स्वरूप मोगली फर्मानाहून निराळें असें आहे. ( २ ) मीरान मुहम्मदशाह व आदिलशाह हीं नांवें फरूकी सुलतानांच्या वंशावळींतच आढळतात. ( ३ ) हें फर्मान ज्या वेळीं दिलें त्यावेळीं फरूकी सुलतानांचा अम्मल बऱ्हाणपुरास होता किंवा सामान्यतः फरूकी सुलतानांचा अम्मल बऱ्हाणपुरावर होता असें म्हणण्यास पुरावा आहे.

या कागदाची आरंभीची तारीख सुहूर सन १००० अशी व शेवटची तारीख १००६ रबिलावल २४ ही आहे. शेवटच्या तारखेंतील वर्षाचा आंकडा अक्षरें व संख्या अशा दोन्ही रीतींनीं दाखविला आहे. या दोन तारखा परस्परांशीं जुळत नाहींत. सुहूर १००० शीं जुळता हिजरी सन १००८ हा येतो आणि हिजरी १००६ ला जुळता सुहूर सन ९९८ हा येतो. या दोहोंचा मेळ कसा घालावयाचा हें माझ्या सध्यां ध्यानांत येत नाहीं किंवा यांपैकीं एक कोणता तरी उल्लेख चुकला असला पाहिजे. मी हिजरी १००६ हा उल्लेख प्रमाण धरून कांहीं चर्चा केली आहे. ती कितपत बरोबर आहे हें आणखी कागद मिळाल्यावर ठरणारें आहे. हि. १००६ च्या रबिलावल २४ शीं जुळती मिति श. १५१९ आश्विन वद्य १० (इ. स. १५९७ आक्टोबर २५). दुसरा उल्लेख ग्राह्य धरण्याचें कारण असें कीं, बहादुरखान किंवा सिकंदरखान हा हि. १००८ मध्यें अकबराचा कैदी बनला व कैदी बनण्यापूर्वी कांहीं दिवस तो वेढ्यांत अडकून पडला होता. अर्थात अशा वेळीं तो परवाना देणें शक्य दिसत नाहीं.

ह्या फर्मानांत पुढील गोष्टी ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत.

( १ ) हा हुकूम बऱ्हाणपूर शहरामधील जिझिया करवसुलीच्या

सात्यामधील ठाणेदार व कारकून यांना धाडलेला आहे. या वेळीं रावेरकर देशमुखांचे पूर्वज बहुधा बऱ्हाणपुरांतच रहात होते असें दिसतें. एरवीं हा हुकूम बऱ्हाणपूर शहरांतील विशिष्ट अधिकाऱ्यांना दिला नसता.

( २ ) यांत दत्ताजी महाद नाईक आंधारे यांनीं सांगितलें आहे कीं, माझे वडील व चुलते या मुलखांत आले. कोठून आले तें सांगितलें नाहीं. या मुलखांत म्हणजे बऱ्हाणपूरच्या आसपासच्या मुलखांत होय.

(३) ते ज्या वेळीं या मुलखांत आले त्यावेळीं मीरान-मुहम्मदशाह राज्य करीत होता. हा मुहम्मदशहा व पुढें उल्लेखिलेला मीरान आदिलशाह हे दोघेही फरूकी सुलतानांपैकीं आहेत. रा. ब. हिरालाल यांनीं या वंशाचा बऱ्हाणपूर येथील जुम्मा मशीदीवर असलेला संस्कृत शिलालेख चर्चेसह छापला आहे ( Ep. Ind. Vol. IX. ). त्यांत त्यांनीं या खानदेशी सुलतानांची वंशावळ दिली आहे. ती सर्व वंशावळ येथें देत नाहीं. पण येवढें मात्र सांगतों कीं तीमध्यें (११) मीरान मुहम्मदखान व(१२)राजा अलीखान उर्फ आदिलशाह या नांवाचे जे दोन पुरुष आहेत तेच येथें अभिप्रेत असले पाहिजेत. पहिल्याचा काळ इ. १५६६ ते १५७६ व दुसऱ्याचा काळ इ. १५७६ ते १५९६ असा आहे. प्रस्तुत पत्र इ. १५९६ च्याही पुढील काळांतील असल्यामुळें अलीखानाचा मुलगा खिज्रखान उर्फ बहादुरखान हा हें देणारा असला पाहिजे. हा या वंशांतील शेवटचाच पुरुष आहे हें लक्षांत आणलें असतां याच्याशिवाय दुसरा कोणीच हें पत्र देणारा होऊं शकणार नाहीं हें दिसून येईल. याच्या कारकीर्दींतच अकबरानें याचें राज्य खालसा केलें असलें तरी अगदीं शेवटपर्यंत बऱ्हाणपूर या फरूकी वंशाच्या ताब्यांत होतें असें दिसतें. मघाशीं उल्लेखिलेल्या लेखाचा काळ श. १५११ पौष शुद्ध ११ ( इ. १५९० जानेवारी ५) असल्यानें यावेळींही त्यांची सत्ता बऱ्हाणपुरावर खात्रीनें होती असें वाटतें. अनुमान करण्याचें कारण पत्रावर ज्यानें हें पत्र दिलें त्याचें नांव नाहीं. विजापूरच्या चार बादशहांपैकीं जेव्हां जेव्हां एकाद्या बादशहानें फर्मानावर नादे अली या आशीर्वचनाचा शिक्का उठविला तेव्हां तेव्हां फर्मान कोणत्या बादशहाचें हें ठरविण्यास माहीत असलेल्या त्याच्या कारकीर्दींच्या वर्षांशिवाय दुसरा उपाय नसतो. तीच स्थिति येथेंही आहे. दत्ताजी आपल्या वडिलांना व चुलत्यांना मुल्ला जाद संबोधितो. मुल्ला म्हणजे धर्मकृत्यें करणारा किंवा गांवजोशी -

मुआजाद म्हणजे त्याचीं मुलें. रत्नेरकरांचे पूर्वज पूर्वी जोमकी करीत होते. असें दिसतें.

( ४ ) दत्ताजी तक्रार करीत आहे कीं, मुहम्मदशहा व आदिलशहा यांच्या वेळीं आम्हांस जिझिया माफ असतां गेल्या तीन सालांपासून जिझिया वसूल केला जात आहे. हें पत्र हिजरी १००६ चें म्हणजे श. १५१९ ( इ. १५९७ ) चें आहे. तत्पूर्वी ३ वर्षे म्हणजे श. १५१६ ( इ. १५९४ ) साल येतें. या सालीं मीरान आदिलशहा हा मुरादच्या आधिपत्याखालीं दक्षिणेवर मोगलांची जी स्वारी झाली तींत हजर होण्यास गेला असल्यामुळें रिब्रखान कारभार पाहूं लागला असावा. तेव्हां त्याच्या कारकीर्दीच्या आरंभापासून यांच्याकडून जिझिया वसूल करूं लागले होते असें म्हणण्यास हरकत नाहीं.

( ५ ) या कराची यांच्याकडून दर साल वसूल केली जाणारी रकम १२॥ मुजाफरी व ‍॥४ सुर्दा इतकी होती. मुजाफरी या नाण्याविषयीं मला फारशी माहिती नाहीं.* ‍॥४ खुर्दा याबद्दल फारसींत बीस्त हश्त चितल असें म्हटलें आहे. चितल हें नांव तांब्याच्या नाण्यांना असे. येथील हिशेबावरून ४८ असलया चितलांचें एक पूर्ण नाणें होत होतें असें दिसतें. हें नाणें मुजाफरीच्या खालच्या पायरीचें असावें.

महाराष्ट्रांत ४८ रुक्यांचा एक टका होत असे हें प्रो. वा. गो. काळे यांनीं एका निबंधांत उत्तम तऱ्हेनें दाखवून दिलें आहे ( त्रै. व. १२ अं. १ ). तेव्हां २८ चितल किंवा सुर्दा म्हणजे २८ रुके असणें शक्य आहे. पण येथें असा एक प्रश्न आहे कीं, ज्यास आपण येथें टका म्हटलें आहे तें जर मुजाफरीच्या खालचें नाणें आहे असें धरलें तर मुजाफरीची संख्या सांगतांना साडेबारा ऐवजीं १२ मुजाफरी सांगून अर्ध्या मुजाफरीचें या खालच्या पायरीच्या नाण्यांत रूपांतर कां केलें नाहीं ? आपण हिशेब सांगताना १२॥ रुपये व १३ पैसे असें सहसा लिहिणार नाहीं. मग येथें १२॥ मुजाफरी व २८ चितल असें कां लिहिलें आहे ?

* मुजाफरीच्या बाबतींत मुंबई येथील प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियमच्या आर्किऑलॉजीच्या खात्याचे क्यूरेटर श्री. आचार्य यास पृच्छा केली असतां, त्यांनीं कळविलें आहे कीं, मुजाफरी हें नाणें गुजराथ सुलतानांपैकीं ३रा मुजफ्फर शाह यानें पाडलें होतें. तें १६ व्या शतकाच्या उत्तरार्धांत गुजराथ व खानदेश या भागात चालूं होतें. तें हीणकस रुप्याचें केलें असून सुमारें आठ आणे किंमतीचें होतें.

ले. ३ } [शिक्का बदामी आकाराचा.] { श. १९१९ आश्विन वद्य १०
फो. चा. सं. } { इ. १५९७ आक्टोबर २९

अहुदहदारान व कारकुनान जीझयह शहर बन्हानपूर बिदानन्द कह दर शुहूर सनह अल्फुल महसूलियह दताजी महाद नायक अन्ध्यारह बंदगाह जहाँ पनाह खन्द जिल्लहू अर्ज नमूद कह बह पिदर बन्दह मुसम्मा महाद नायक व बिरादरान कासी नायक व सोनों नायक चूं दर झमान हजरत जन्नत आशियानी फिर्दोस मकानी मीरान मुहम्मद शाह ताबल्लह शराह व जअलुल जन्नत मस्वाह अझ मुल्क खीश बमुलाझिमत ईशान रसीदन्द अझ हर जहत इनायत व आतिफत फर्मूदह जीझयह मुआफ फर्मूदन्द व दर झमान हजरत जन्नत आशियानी फिर्दोस मकानी मीरान आदिलशाह ताबल्लह शराह व जअलुल जन्नत मस्वाह चन्द रोझ हमह आं तौर मअमूल बूद व चन्द रोझ अहुदहदारान जीझयह बसर बन्दह कमीनह मुख्लिश दुवाइदह व नीम मुजफ्फरी व बिस्त हस्त चितल खूर्दह जीझयह जम्अ कर्दन्द अगर आं जीझयह अझ ऐन इनायत व करम मुआफ फर्मायन्द ऐन बन्दह नवाझी गर्दद बिनाबरान अरीमहअश दर राए जहाँ आराए आउर्दह दताजी महादनायकरा वापिसरान जीझयह मुआफ अझ सनह अलमझ्कूर मुआफ फर्मूदह अन्द बायद कह बहुक्म पर्वानह अमल नमूदह पर्वानह नझ्द दताजी मझ्कूर बाझ दहानन्द दरीं बाब [ताकीद] कुल्ली दानिस्तह मुहताज ताकीद न शवन्द तहरीरन् बाद अस्रुल आली खल्द निकादह फित्तारीखिरीबअ व अर्बईन शहर रबीअ उल्-अव्वल सनह सित्त वअल्फुल्–हिमारिय्यतुल्–मुस्तफविय्यह सनह १००६

अहो[दा]दारान व कारकोनान महल जेजया सहर बुन्हांनपुर मालुम दानद सुहुर सन अळफ दताजी माहाद नाईक आंधारे हुजुर हजरत दीवाणके बंदगी मालुम कीया के बंदेका वाळीद माहाद नाईक व चीचा कासी नाईकव सोन नाईक हजरत महमदस्याहा के वख्त ईस

मुलुकमे आऐ मुळाजादोंपर हरी येक बातका रहम कीया व जेजया माफ कीया था उस पीछे हजरत मीरां आदीळस्याह के वख्त भी उस हुकुम अमळ हुवा केतेक देस हुऐ महळ मजकुर के अहो[दा]दारो बंदे के सीर जेजया जमे कीया ताा ती साळीया हरसाळ मुजाफरी १२॥ व पुर्दा ॥४ हाळी माफ होवे तो बंदा न्याहाळ होवे सदरहु मालुमात यातीर मुबारप आण दताजी माहाद नाईक पुं जेजया सन मजकुर पास थी देपीळ पीसरांन पुं माफ कीया है येही परवाना दफतर दीपत्था व मजेरे लेना असळ परवाना नफर मजकुर पास रहने देना ताळीक कर दफतर मे रापना मुरतब तेरीप २४ माहे रबीळवल सीत

[ पाठीवर फारशी तीन शिक्के व त्या खालीं क्रमानें पुढील तीन ( दोन मोडी व १ फारसी ) शेरे ]

( १ ) बार दफतर मजमु हींदवी ( २ ) बार दफतर माहाल्हा (?)

( ३ ) दफ्तर मजममूअ कारस्ती वरुजू[अ] शुद

२

हें पत्र म्हणजे औरंगजेबानें दिलेलें फर्मान आहे. शिक्का, तुग्रा ( नक्षीदार नांव ) व तारीख ह्या तिन्ही गोष्टी हें फर्मान औरंगजेबाचें आहे हें दाखवितात. यांत औरंगजेबानें श्री. रावेरकर राजांच्या घरांत चालूं असलेल्या कामाची व उत्पन्नाची वाटणी करून दिली आहे. या वाटणीचें कारण असें:—खानदेश सुभ्यापैकीं रावेर व आदिलाबाद या परगण्यांचीं देशमुखी, देशपांडकी व कानूनगोई हीं कामें दत्ताजी गोपाळ व महादेव त्रिलोचनपाल हे करीत असतां महादेव मयत झाला व त्याचें काम पहाण्यास कोणी पुरुष राहिला नाहीं. २।३ विधवा मात्र राहिल्या. पण त्यांच्या हातून काम होणारें नव्हतें. यामुळें महादेवाचें काम कोणी करावें हा प्रश्न उत्पन्न झाला.

वाटणी करतांना आदिलाबाद परगण्यांतील महादेवाच्या वाटणीची देशमुखी, देशपांडकी व कानूनगोई हीं कामें नारोजी यशवंतराव याजकडे देण्यांत आलीं आणि रावेर परगण्यांतील महादेवाच्या वाटणीचीं वरील तीन कामें, त्या परगण्यांत त्याच्या नावानें गावोगाव असलेले लाजिमे व इनामें आणि असीरगड परगण्यांतील वडोदें गांवीं असलेली बाग ( जिचें उत्पन्न २१ हजार दाम असे ) या बाबी दत्ताजी गोपाळ याजकडे देण्यांत आल्या.

महादेव मेल्यावर त्याची सर्व चीजवस्तू जप्त करून त्याच्याकडे सरकार येणें किती निघतें तें पाहिलें असतां ३५४३॥ रुपये इतकें निघालें. हें वास्तविक त्याच्या घरांतील विधवांकडून वसूल करावयाचें. पण त्यांजपाशीं कांहींच माया नव्हती आणि दत्ताजी व नारोजी यांनीं त्यांस महादेवाचीं इतर कामें दिल्याबद्दल पेशकश देण्याचें कबूल केलें होतें. तेव्हां वरील रक्कम विधवा बायांना माफ केली आणि त्यांच्यांशीं तंटा न करण्याबद्दल वरील दोघां इसमांना बजाविलें.

ले. ४ } बिस्मिल्लाह रहमनुर्रहीम {श. १५८२ फाल्गुन शु. ३
मू. दा. प. } [ औरंगजेबाचा हुक्म व शिक्का ] {इ. १६६१ फेब्रुवारी २१

चूं बअर्जे मुकद्दस मुअल्ला रसीद कह खिद्मत देसमुखी व देसपान्देगी व कानूनगोई पर्गनह रावेर व आदिलाबाद मुतअल्लुक वसूबह खान्देस बदताजी वलद गोपाल नायक व महादेव वलद तिलोचनपाल बिल मुनासिफह मुकर्रर बूद व महादेव मज्कूर फौत शुदह व वारसी अज्ञ न मान्दह बिनाबरां हुक्म जहां मुताअ वाजिबुल इत्तिबाअ शर्फ सुदूर याफ्त कह चूं खिद्मत देसमुखी व देसपान्देगी व कानूनगोई पर्गनह आदिलाबाद मुतअल्लुक हिस्सह मुतवफ्फा हस्बुल इल्तिमास अज्दुल सिलाफतुल कुब्रा रुक्नुस्सल्तनतुल उज्मा मुतमिनुद्दौलतुल बाहिय्यह मुअमिदुल हज्रतुल खाकानियह क़ुद्दह उम्राए अजाम रफीअ उल मकान मुलाजह सवानीन किराम अजीमुश्शान उम्दतुल्मुल्क यार वफादार अमीरुल उम्रा बनारोजी वसवन्तराव मर्हमत फर्मूदह ईम खिद्मत देसमुखी व देसपान्देगी व कानूनगोई पर्गनह रावेर मुतअल्लुकन् हिस्सह मुतवफ्फा बादस्तूर व लवाझिम व इन्आम अज्ञ फस्लह व देह बदही ओं पर्गनह व बाग मौजअ वरोदह मिनअमाल पर्गनह आसीरगढ़ बीस्त व यक हज़ार दाम जम्अ रकमी दारद बदस्तूर साबिक बदताजी वलद गोपालनायक मज्कूर हस्बुज्जमन मुकर्रर व मुफव्वज बाशद कह कमायन बर्गी बलवाझिम व मरासिम खिद्मात मज्कूरह अज्ञ करार वाकअ पर्दाख्तह दकीकह अज्ञ दकायक दौलतख्वा ( सा ) ही नामर्ई न गुजारद व वजह पेश्कशरा बमूजब तमस्सुकी कह बदफ्तरखानह मुअल्ला सिपुर्दह वासिल खज़ानह आमिरह गर्दानद व नीज़ बअर्जे अक्दस रसीद कह बअद अज्ञ जब्त तमामी अम्वाल महादेव मुतवफ्फा मुन्दिरा

सद हज़ार व पान्सद व चहल व शह व नीम रुपियह अझ जुम्लह मुतालबह सर्कार खासह शरीफह बर जिम्मह(म=?) महादेव बाकी मान्दह व दूसह बेवह कह अझू मान्दह अन्द मुफ्लिस अन्द हुक्म जहां मुताअ सादिर शुद कह चूं बिरसह मज्कूर चीझी नदारन्द व बर देसमुखी हिस्सह मुतवफ्फा दताजी व नारोजी मज्कूरैन मुफ्लिगी पेश्कश कबूल कर्दह अन्द ततम्मह मुतालबह महादेवरा बतसद्दुक फर्क मुबारक मुकद्दस मुआफ फर्मूदह ईम बायद कह मुझाहिम व मुतअर्रिज बिरसह महादेव मुतवफ्फा न शवन्द व हस्बुल हुक्म अक्दस अमल नुमायन्द व वज्ह मर्सूम देसमुखी व देसपान्देगी व कानूनगोई रा मुताबिकह जाबितह व मअमूल कदीम बतसर्रुफ आहां बाझ गुझारन्द मीबायद कह हुक्काम व अम्माल व जागीरदारान व करूरियान हाल व इस्तिक्बाल ई हुक्म कजा शियम रा मुस्तमर दानिस्तह आंहारा देसमुखी व देसपान्देगी व कानूनगोई आंजा शनास्तह दस्त तसद्दी आंहा दर उमूर मुतअल्लुकह आं सिग्रात कवी दारन्द अझ फर्मूदह दर न गुजरन्द बतारीख गुर्रह शहर रजब सनह सह अझ जुलूसवाला नविश्तह शुद

---

## ४ एक निजामशाही फर्मान.*

( श्री. ग. ह. खरे. )

प्रस्तुतचें निजामशाही फर्मान श्री. द. वि. आपटे यांनीं मजकडे दिलें. हें पुणें येथील ठकार घराण्यासंबंधींचें आहे. सामान्यतः निजामशाही फर्मानें कशा प्रकारचीं असतात हें मी इतरत्र सांगितलें आहे ( पहा– शिवाजी निबंधावली भाग २ पृ. ६६–६९ ). त्याचें उदाहरण म्हणून हें फर्मान येथें देत आहे. नेहमींप्रमाणें यांत प्रथम फारसी मजकूर व त्या-खालीं फारसी मजकुराच्या सारांशरूपानें मराठी मजकूर आहे. फारसी मजकूर व मराठी मजकूर हे दोन्हीं सारांशरूपानें जरी एकच असले तरी कित्येक वेळां मराठी मजकुरांतील शब्द लागण्याच्या दृष्टीनें व कोहीं वेळां नवीन माहिती मिळण्याच्या दृष्टीनें फारसी मजकुराचा निस्संशय उपयोग होतो. उदाहरणार्थ–राजवाडे खंड २० ले. २५४ मध्यें घोनस्केद ६ (ओ.५)

* पा. स. १६।१०५१

आणि दरान रुके सा (ओ. १९) असें छापिलें आहे. येथें मुळांत कोणते शब्द असावेत हें प्रथम माझ्या लक्षांत येईना. पण हें फर्मान पहावयास सांपडताच वरील लेखनांतील वाचनाची चूक चटकन लक्षांत आली. घोन किंवा दरान याबद्दल दररोज असें व स्केड ६ बद्दल रुके ८६ असें वाचन सहज करतां येतें. ही चूक ध्यानांत येण्याचें कारण फर्मानांतील स्पष्ट शब्दयोजना होय. फारसी फर्मानांत दररोज हे शब्द स्पष्ट आहेत. मराठींत त्यांचा अपभ्रंश दरोज असा झाला. जवळजवळ बालबोधी रु काढून त्यास मोडी के जोडल्यामुळें स्के असें अक्षर आणि आळ्याचें टोक रेघेस लावल्यामुळें व आळ्याचें टवळें पूर्वी अर्धवर्तूळ काढीत असल्यामुळें आळ्याबद्दल ड असें वाचलें गेलें. या दोन्ही चुका होणें अगदीं संभवनीय आहे हें निजामशाहीच्या अखेरच्या कालांतील मोडी लेखन जाणणाऱ्यांच्या तेव्हांच लक्षांत येईल. ही वाचनाची चूक फारसी मजकुरामुळेंच चटकन ध्यानांत आली. असो.

या फर्मानांत जेथें मोडींत ३ रुके सांगितले आहेत त्याबद्दल फारसींत कांहीं दाम म्हणून सांगितलें आहे. दामांचा आकडा स्पष्ट आहे. पण तो कोणती संख्या दाखवितो हें समजत नाहीं.

हे तीन रुके पुणें येथील भटजी भानभट बिन रामेश्वर भट ठकार यांस धर्मादाय पण इनाम म्हणून पुणें परगण्याच्या जकात खात्याकडून रोज मिळत असत.

ही व्यवस्था हैबतखानानें सु. १०१० (श. १५३१) मध्यें दिलेल्या पत्राप्रमाणें चालू होती. पण उपर्युक्त ठकारांनीं फर्मानाची मागणी केल्यामुळें हें फर्मान दिलें गेलें आहे.

अशा प्रकारचीं नवीन फर्मानें करून घेण्याबद्दलचा हुकूम मलिकअंबरानें एकंदर इनामदारांना सोडलेले होते. त्याप्रमाणें ठकारांनीं हें फर्मान घेतलेलें आहे.

हें व या वेळचीं इतर फर्मानें श. १५४० च्या सुमारास पुण्यावर अहमदनगरच्या निजामशाहीचा अमल होता हें स्पष्ट दाखवीत आहेत.

ले.५ } { श. १५४० आश्विन वद्य ७
फां. चा. सं. } { इ. १६१८ सप्टेंबर ३०

[ वर आरंभीं १, डाव्या अंगास १, व फारसी मजकुराखालीं २ असे ४ अस्पष्ट फारसी शिक्के ]

अझ दीवान रस्तखानह खास बजानिब कारकुनान हाल व इस्तिक्बाल व देसमुखान पर्गनह पूनह बिदानन्द कह शुहूर सनह तिसअ अशर व अल्फ बाबत झकात अझ ई जुम्लह रोझमरह बरस्म भानभत बिन रामसर भत वकार झुन्नारदार साकिन कस्बह पूनह दर बन्दगी हजरत मअ्लूम नमूद कह मुदरा इन्आम बदल सिद्कह दर रोझ ४ दाम बर महल झकात पर्गनह पूनह बरहुक्म मुर्दखत खान अअजम हैबतखान सनह अशर व अल्फ दादह अस्त बदीं नूअ जारी अस्त बदीं नूअ फर्मान कर्दह बदहानीदन्द चुनीन रोकअ मम्लिकत मदारी मलिक अन्बर यकन्दर इन्आमदारान २० माह शव्वाल सादिर अस्त दरीं बाबत फर्मान वासिकह खास महेमत शवद मअ्लूम शुद बरहुक्म इशारत दीवान अआला भानभत बिन रामसर भत वकार झुन्नारदार साकिन पूनह रोझमरह बदल इन्आम सिद्कह द [र*] रोझ ४ दाम बर महल झकात पर्गनह मज्कूर बर हुक्म मुर्दखत हैबतखान सदरह दादह अस्त बदीं नूअ हालियान अझ हुजूर दहानीदह दर हर साल उज्र दर फर्मान न कुनन्द तआलिक गिरफ्तह असल बाझ बदहन्द रोकअ मम्लिकत मदारी मलिक अन्बर २० माह शव्वाल दर रोझ[1]

---

## ५ कोल्हापूरकर कुळकर्णी यांचीं आदिलशाही फर्मानें.*

( श्री. ग. ह. खरे. )

प्रास्ताविक–सोबतचीं आदिलशाही फर्मानें मंडळाचे चिटणीस सरदार आबासो मुजुमदार यांच्या कृपेनें मिळालीं. तीं त्यांनीं कोल्हापूर येथील श्री. कुळकर्णी यांजकडून आणलीं. फर्मानें ऐतिहासिक, सामाजिक

१ या पत्रांतील मराठी भाग ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खंड १ पृ. १२० वर छापला असल्यानें तो येथें दिलेला नाहीं. * पा. स. १६।१८५१

वगैरे दृष्टीनें महत्त्वाचीं असल्यानें त्यांचा येथें यथाशक्ति परामर्श घेण्याचें योजिलें आहे. श्री. कुळकर्णी यांचे आपण याबद्दल आभारी असलें पाहिजे.

फाल—यांचा काल शक १५५७ ते १५९६ पर्यंतचा आहे. यांत मुहम्मदशहा याचीं १७, अली आदिलशाह याचीं ७ व शिकंदर याचें १ अशीं २५ फर्मानें आहेत.

स्थळ—या फर्मानांपैकीं ऐतिहासिक फर्मानें सोडून केवळ वृत्तिविषयक फर्मानें पाहिलीं तर त्यांत वांई ( वाई ), कल्हर ( कऱ्हाड ) व कोलापूर ( कोल्हापूर ) या तीन परगण्यांचा व त्यांतील गांवांचा उल्लेख आला आहे. फर्मानांचे मालक जे कुळकर्णी त्यांजकडे या तिन्ही परगण्यांतील कांहीं ना कांहीं गांवें चालत असल्यामुळें त्यांचा उल्लेख येणें स्वाभाविक आहे. तसेंच फर्मानें जरी प्रत्यक्ष त्यांनाच पाठविलीं नसलीं तरी त्यांचे विषयीं असल्यानें त्यांची एक एक प्रत या कुळकर्ण्यांपाशीं असणें साहजिक आहे. याशिवाय ज्यांत राजकीय हालचालीविषयीं दिलेले हुकूम आहेत अशींही कांहीं फर्मानें यांमध्यें आहेत.

या फर्मानींतील कुळकर्ण्यांचे त्या वेळचे पूर्वज नारो विश्वनाथ हे प्रसिद्ध अफ्जलखानाचे हेजीब होते ( फर्मान ९ ). यांचे मुलगे रामकृष्ण नारायण हेही कोणी अधिकारी असावेत असें वाटतें.

कांहीं फर्मानें मूळें व विवरण यांसह व कांहीं केवळ सारांशरूपानें यावयाचीं असें मीं ठरविलें आहे. तत्पूर्वी येथें फर्मानांचा काळ, अधिकारी व अधिकारप्रदेश यांचें कोष्टक अभ्यासकांस उपयोगी पडावें म्हणून दिलें आहे. ज्यांस मूळें किंवा नकला पहावयाच्या असतील त्यांसाठीं तीं मंडळांत ठेविलीं आहेत.

| | |
|---|---|
| १ हि. १०४५ साबान १२ ( श. १५५७) | अलीखान सर सम्त व कारकून परगणे कोलापूर ( कोल्हापूर ) |
| २ हि. १०५० जिल्हेज ५ (श. १५६३) | देसाई परगणे कल्हर ( कऱ्हाड ) |
| ३ हि. १०५० जिल्हेज ६ ( श. १५६३ ) | वर्तमान व भावी अधिकारी व देसाई परगणे वांई ( वाई ) |

४ हि. १०५१ जवल ११ (श. १५६३) देसाई परगणे कल्हर
५ ,, ,, ,, ,, ,, ,, ,,
६ हि. १०५२ सफर ५ (श. १५६४) { वर्तमान व भावी अधिकारी व देसाई परगणे वांई
७ हि. १०५२ जवल १७ (श. १५६४) ,, ,, ,,
८ ,, ,, ,, ,, { सुरूरखान हवालदार व देसाई परगणे कल्हर
९ हि. १०५४ रखर १५ (श. १५६६) { निअमतखान हवालदार व कारकुन मामले वियापूर (विजापूर)
१० हि. १०५५ रखर १५ (श. १५६७) { ,, ,, ,, मामले पुरनूर मुहम्मदपूर (विजापुरचें उपनगर)
११ हि. १०५५ जवल २१ (श. १५६७) अंबरखान[1]
१२ हि. ,, ,, ,, ,, झुंजारराव घाटगे[1]
१३ हि. १०५७ रवल १० (श. १५६९) असदखान[1]
१४ हि. १०५७ जिल्हेज २५(श.१५६९) यशवंतराव[1]
१५ हि. १०५८ रवल ७ (श. १५७०) हुद्देदार (ठाणेदार) पेठ (बहुधा विजापुरांतील)
१६ हि. १०६० साबान२(श. १५७२) { मानकोजी नरसिंगराव हवालदार व कारकून किले सातारा
१७ हि. १०६२ मोहरम१३(श.१५७३) हुद्दे. पेठ शहापूर मामले मुहम्मदपूर
१८ हि. १०७० रमजान१४(श.१५८२) अधिकारी व देसाई परगणे कोलापूर
१९ हि. १०७१ रजब ५ (श. १५८२) ,, वर्तमान व भावी आणि देसाई ,,
२० हि. १०७१ जिल्हेज२३(श. १५८३) ,, —— ,, ,, ,,
२१ हि. १०७२ रजब १५(श.१५८३) फाजल अफ्जलखान मुहम्मदशाही हवालदार व मुहमद्र मुलकी ठाणेदार व कारकून किले परेली

१ हुकूम मामुली नसल्यानें परगणा वगैरे नाहीं.

| | | |
|---|---|---|
| २२ | हि. १०७४ मोहरम ८(श. १५८५) | राव अमीनराव[1] |
| २२ | ” ” ” ” | शशखान सर हवालदार अ हसनाबाद[2] (कुलबुर्गा) |
| २३ | हि. १०७५ रजब अखेर (श. १५८६) | वर्तमान व भावी अधिकारी व देसाई परगणे कोलापूर |
| २४ | ” ” ” ” | अधिकारी व देसाई परगणे बांई |
| २५ | हि. १०८५ जिल्हेज १२ (श. १५९६) | देसाई परगणे कागल |
| २५ | ” ” ” ” | राव दियानतराव मजलिसी[2] |

---

१

ले. ६ सु. १०३६ }
हि. १०४५ साबान १२ }

{ श. १५५७ पौष शुद्ध १४
{ इ. १६३६ जानेवारी ११

मुहम्मदशाह→अलीखान सर सम्त व कारकून परगणे कोल्हापूर

कोन्हेरी त्रिमल यानें परगणे मजकूरच्या स्थानिक कर्यातीच्या हरीबा व नंदोबा पत्रक (पे, ते, रे, काफ) याजकडे असलेल्या देशकुळकर्णाच्या मिराशीबद्दल (आपणांस मिळावी यासाठीं) मिराशीचा दोन सालाचा वसूल, म्हणजे एका सालचा नजराणा, १०० होन देण्याचें कबूल केलें आहे. तरी वरील मिरास त्याजकडे तीवरील हक्क वगैरेसह चालू ठेवावी. नजराण्यांपैकीं अर्धा हिस्सा बादशाही खजिन्यांत व अर्धा हिस्सा व्यवस्थासाठीं जमा करावा. या सालचे ५० होन वसूल झालेले आहेत व पुढील सालीं वसूल व्हावयाचे ५० होन वसूल करून खात्याला दाखल करावे.

२

ले. ७ सु. १०४१ }
हि. १०५० जिल्हेज ५ }

{ श. १५६३ चैत्र शुद्ध ७
{ इ. १६४१ मार्च ८

मुहम्मदशाह→देसाई परगणे कऱ्हाड

या परगण्यांतील तांबवें कर्यातींपैकीं वेन्हे गावचा कुळकर्णी नारो विश्वनाथ यानें बादशहास विनंति केली कीं “ वरील गावचें कुळकर्ण

१ पहा पृ. १६ पादटीप. २ हा अधिकारी फर्मानाच्या पेठीन आहे.
ऐ. फा. सा. सं. १–३

पिढी दर पिढी मजकडे आहे. पूर्वी हा गाव सय्यद हुसेन(=?) मोकाशी याजकडे असतां त्यानें गावावर जुलूम केल्यामुळें गावचे पुढारी व रयत गाव सोडून गेले. त्यांबरोबर माझा चुलता कम्लू हाही गेला व त्यानें त्यांची समजूत काढून त्यांस पुष्कळ काळानें परत गावावर आणलें. त्या वेळीं कुळकर्ण्याचें काम करण्यासाठीं आमच्यापैकीं कोणी तेथें नसल्यानें गावकऱ्यांनीं तेथील जोशाकडून काम करून घेतलें. पण पुढें मी गावीं जाऊन माझें काम परत मागितलें असतां गावकऱ्यांनीं मला तें देऊन तशाप्रकारचा महजरही करून दिला. आतां आपलें फर्मान पाहिजे आहे." तरी नारो विश्वनाथ यास त्याच्या इच्छेप्रमाणें फर्मान दिलें आहे.

३

| | |
|---|---|
| ले. ८ सु. १०४१, हि. १०५० जिल्हेज ६ | श. १५६३ चैत्र शुद्ध ८ इ. १६४१ मार्च ९ |

मुहम्मदशाह→अधिकारी व देसाई परगणे वाई.

नारो विश्वनाथ, कुळकर्णी मौजे टाकळें, यानें विनविलें कीं, "टाकळें येथील कुळकर्ण पूर्वीपासून माझें आहे. पूर्वी एक विधवा आपल्या मुलाला घेऊन आमच्या पूर्वजांपाशीं आली. पूर्वजांनीं त्या मुलाचें पालनपोषण मुंज, लग्न, वगैरे करून देऊन कुळकर्ण करण्यास सांगितलें. कांहीं दिवसांनीं माझे पूर्वज मेले. नंतर कित्येक दिवसांनीं तो मुलगाही मेला, तेव्हां त्याचा मुलगा कुळकर्णाचें काम पाहू लागला. मी माझ्या गावास येऊन त्यास दूर करून दुसऱ्यास नेमू लागलों. तों तो मजपाशीं भांडू लागला व दुसऱ्यास काम करू देईना. नंतर गंगाजी देसाई (व स्वतःचे वारस?) यांस ही गोष्ट समजून त्यांनीं त्यास दूर करून कुळकर्णाची मिरास माझे अधीन केली व महजर करून दिला. महजराप्रमाणें महाराजांचें फर्मान मिळावें." विनंति ध्यानांत घेऊन टाकळें येथील कुळकर्ण नारो विश्वनाथ यास देण्याचें ठरविलें आहे. तरी उपर्युक्त कुळकर्ण नारो विश्वनाथाच्या ताब्यांत द्यावें. कोणासही हरकत करू देऊ नये.

४

ले. ९ सु. १०४१ } { श. १५६३ श्रावण शुद्ध १४
हि. १०५१ जवल ११ } { इ. १६४१ आगष्ट ९

मुहम्मदशाह→देसाई परगणे कऱ्हाड

नारो विश्वनाथ, कुळकर्णी व जोशी मौजे किरोली, यानें विनंति केली कीं, " किरोलीचें कुळकर्ण व जोशकी वाडवडिलांपासून माझी आहे, सध्यां मजकडे चालत आहे व इनाम हकलवाजिमे वगैरे खात आलों आहे. आतां आपलें फर्मान मिळावें." तरी नारो विश्वनाथाच्या विनंतीप्रमाणें सालावाद जसें चाललें आहे तसें त्याचे जोशकी व कुलकर्णकी हे हक्क वंशपरंपरा त्याजकडे चालू ठेवावे.

५

ले. १० सु. १०४१ } { श. १५६३ श्रावण शुद्ध १४
हि. १०५१ जवल ११ } { इ. १६४१ आगष्ट ९

मुहम्मदशाह → देसाई परगणे कऱ्हाड

नारो विश्वनाथ यानें विनंति केली कीं, " वेल्हे येथील कुळकर्ण वाडवडिलांपासून माझी मिरास आहे. माझे वाडवडील सदरहू गावच्या पाटलांवर नाराज होऊन गाव सोडून गेले. तेव्हां पाटील गावच्या जोशाकडून कुळकर्णाचें काम करून घेऊं लागले. कांहीं वर्षांनीं मी गावीं आलों. तेव्हां गावकऱ्यांनीं सांगितलें, ' कुळकर्ण तुझेंच आहे, तर तूं तें कर. ' असें सांगून महजरही करून दिला आपलें फर्मान पाहिजे आहे." तरी वेल्हे येथील कुळकर्ण नारो विश्वनाथ यास दिलें आहे. तरी कुळकर्ण त्याचे ताब्यांत देऊन त्याजकडे वंशपरंपरा चालविणें व सदरहू जोशास हरकत करू देऊं नये.

६

ले. ११ सु. १०४२ } { श. १५६४ वैशाख शुद्ध ६
हि. १०५२ सफर ५ } { इ. १६४२ एप्रिल २५

मुहम्मदशाह → अमलदार व देसाई परगणे वाई

नारो विश्वनाथ वनपाळ यानें विनंति केली कीं, "मौजे टाकळें व मौजे बोरगाव संमत कोरेगाव येथील कुळकर्ण व जोशकी वाडवडिलां

पासून माझी मिरास आहे. माझ्या वाडवडिलांनीं मालो वल्लाळ व विठ्ठल हरी यांस ती चालविण्यासाठीं मुतालीक ठेविलें होतें, पण त्यांनींच माझ्या मिरासींत हरकत मांडली. हाकीम शरा, अमलदार व इतर गावकरी यांनीं जमून न्याय करून दोन्ही वतनें माझींच आहेत असें ठरविलें. त्याच वेळीं उपर्युक्त दोघांनीं सर्वांसमक्ष सांगितलें कीं, 'आमचा दोन्ही वतनांशीं कांहीं संबंध नाहीं. आम्हांस मुतालीक म्हणून ठेविलें होतें.' तेव्हां त्यांना दूर करून दोन्ही वतनें माझ्या स्वाधीन केली. तीं मी रणदुल्लाखानाच्या खुर्दखताप्रमाणें भोगत आहे. आपलें फर्मान मिळावें." तरी तीं वतनें त्यास द्यावी असें फर्माविलें आहे. तेव्हां वरील दोन्ही वतनें त्यांवरील हक्कांसह त्याचे ताब्यांत देऊन वंशपरंपरेनें त्याजकडे चालू ठेवावीं.

७

ले. १२ सु. १०४२ }　　{ श. १५६४ श्रावण वद्य ४
हि. १०५२ जवल १७ }　　{ इ. १६४२ आगस्ट ४

बादशहा → अमलदार व देसाई परगणे वाई

नारो विश्वनाथ, कुळकर्णी व जोशी मौजे टाकळे व बोरगाव यानें विनंति केली कीं, "बोरगाव व टाकळे या गावीं अनुक्रमें ½ व १ चावर जमीन, प्रत पहिली, रणदुल्लाखानाच्या खुर्दखताप्रमाणें मला इनाम चालू आहे. आपलें फर्मान मिळावें." तरी रणदुल्लाखानाच्या खुर्दखताप्रमाणें त्याजकडे चालू असलेली सदरहू जमीन तीवरील हकलवाजिमे व पट्या यांसह त्याच्या ताब्यांत देऊन वंशपरंपरेनें त्याकडेच चालू ठेवावी.

८

ले. १२ सु. १०४२ }　　{ श. १५६४ श्रावण वद्य ४
हि. १०५२ जवल १७ }　　{ इ. १६४२ आगस्ट ४

मुहम्मदशाह → सुरूरखान हवालदार व देसाई परगणे कऱ्हाड

नारो विश्वनाथ, कुळकर्णी मोजे देहे कर्यात सेळगाव परगणे कऱ्हाड, यानें विनंति केली कीं, "मजकडे उपर्युक्त गावांतील पहिल्या प्रतीची अर्धा चावर जमीन तीवरील हक्कांसुद्धा रणदुल्लाखानाच्या खुर्दखताप्रमाणें चालू आहे. आपलें फर्मान मिळावें." तरी सदरहू जमीन नारो विश्वनाथ याजकडे इनाम म्हणून वंशपरंपरा चालू ठेवावी.

९

ले. १४ सु. १०४४ }
हि. १०५४ रखर १५ }

{ श. १५६६ ज्येष्ठ वद्य १
{ इ. १६४४ जून ११

मुहम्मद शाह → निअमतखान हवालदार व कारकून मामले विजापूर.

विजापूर येथील कोटाच्या (=अरावह ?) आंत असलेली बनाजी हरेश्वर याच्या मालकीची धर्मशाळा (मन्झिलखानह) तिच्या इमारतीसह अफ्जलखान मुहम्मदशाही[1] याचा दूत (हाजिब) नारो पंडित यास इनाम दिली आहे. तरी ती त्याच्या ताब्यांत द्यावी.

१०

ले. १५ सु. १०४५ }
हि. १०५५ रखर १५ }

{ श. १५६७ ज्येष्ठ वद्य १
{ इ. १६४५ मे ३१

मुहम्मदशाह → निअमतखान हवाल्दार व कारकून मामले पुरनूर मुहम्मदपूर

कसबे नौरसपूर येथें शहराच्या कोटाजवळ (अरावह) असलेली मीर धनगर याच्या ताब्यांतील पाव चावर जमीन, बाग व पडिक (नाकिर्द) विहीर यांसह, तीवरील हकांसुद्धां नारो विश्वनाथ पंडित यास इनाम दिली आहे. तरी ती त्याच्या ताब्यांत देऊन वंशपरंपरेनें त्याजकडे चालवावी.

११

हें व यापुढील अशीं दोन्ही फर्मानें एकाच विषयाला उद्देशून असून महत्त्वाचीं आहेत. यांत अंबरखान व झुंजारराव घाटगे यांस, पीशजंगखान काफिरांनीं घातलेल्या बाळापूरच्या वेढ्यांत अडकल्यामुळें, बाळापूरकडे जाऊन शत्रूस हुसकून लावून पीशजंगखानाच्या लोकांस मदत करण्याबद्दल सांगितलें आहे. दोन्हीं फर्मानें एकाच तारखेची म्हणजे हि. १०५५ जमादिलावल २१ ची (=श. १५६७ आषाढ वद्य ८= इ. १६४५ जुलै ६) आहेत. यांत उल्लेखिलेल्या कुफ्फार, बाळापूर, पीशजंगखान यांच्या विषयीं जास्त माहिती मिळविली पाहिजे. मुहम्मदनाम्यांत दिलेल्या हकीकतीवरून असें दिसतें कीं, हि. १०५४ सालीं मुहम्मद आदिलशहानें

१ हा अफ्जलखान म्हणजे प्रसिद्ध अफ्जलखान आहे हें उघड आहे.

खानखानान उपपद धारण करणाऱ्या सरदारास कर्नाटक व मलनाड या प्रांतांतील अजूनपर्यंत हातीं न आलेले किल्ले घेण्यास पाठविलें. तो हि.१०५५ साल संपेपर्यंत किल्ले घेण्याच्या कामांतच गढलेला होता व त्याच्या बरोबर गेलेल्या सरदारांत पीशजंगखान हा होता.

या स्वारींतही नेहमींप्रमाणें विजापूरकरांना जय मिळून दोन्ही देशांतील ९ किल्ले त्यांच्या ताब्यांत आले असें सांगितलें आहे. पण या किल्ल्यांच्या यादींत बाळापूरचें नांव नाहीं. कर्नाटकांत दोन बाळापुरें आहेत. एक दोड्ड ( थोरलें ) बाळापूर व दुसरें चिक्क ( धाकटें ) बाळापूर. पैकीं पहिलें हल्लीं म्हैसूर संस्थानांतील बंगलोर जिल्ह्यांत असून दुसरें कोलार जिल्ह्यांत आहे. दोनीही तालुक्यांचीं ठिकाणें आहेत. मात्र हल्लीं चिक्क बाळापूर हेंच सर्व दृष्टीनीं दोड्ड बाळापूरपेक्षां जास्त मोठें आहे. दोन्ही ठिकाणींही पूर्वीं किल्ले होते. त्यामुळें येथें या दोहोंपैकीं कोणतें बाळापूर विवक्षीत आहे हें सांगणें जास्तच कठीण आहे. म्हैसूर गॅझिटियरमध्यें कंठीरव वोडेयर याच्या आधिपत्याखालीं हा ताब्यांत आणण्याचा प्रयत्न झाला असें म्हटलें आहे ( Vol. II p 125 ). पण तो कोणत्या सालीं झाला हें सांगितलेलं नाहीं आणि तत्कालीन तेथील अधिपति बाचे गौडा (Baichs Gouda) यानें मराठयांच्या मदतीनें किल्ल्यास पडलेला वेढा उठवून जवळच झालेल्या एका लढाईंत कंठीरवास ठार केलें असें सांगितलें आहे. तेव्हां प्रस्तुतच्या फर्मानांतील प्रसंग व गॅझिटियरमधील प्रसंग एक असावेत. मुहम्मदनाम्यांत रणदुल्लाखान ऊर्फ रुस्तुम जमा यानें बाळापूर घेतल्याचा उल्लेख आहे. ही गोष्ट हि. १०५२ पूर्वीं झाल्याचें सांगितलें आहे ( शिवाजी निबंधावली भाग ३ पृ. १०३ व १०४ ). तेथेंही बाळापूर कोणतें याचा उल्लेख नाहीं. पण म्हैसूर गॅझिटियरच्या मतें हें बाळापूर म्हणजे दोड्ड बाळापूर होतें ( vol. II p. 68,70 ). रणदुल्लाखानाच्या कर्नाटकावर दोन स्वाऱ्या झाल्या होत्या. पैकीं एकींमध्यें रणदुल्लाखान विजयी झाला होता; पण दुसरींत तो अपेशी झाल्यामुळें दरबारांत त्याजविषयीं प्रतिकूल मत झाल्याचें आपणांस ठाऊक आहे. पण दोड्ड बाळापूर हातचें गेल्याचा कोठें उल्लेख नाहीं. तेव्हां येथें चिक्क बाळापूरच विवक्षित असावें असें वाटतें. तसेंच या ठिकाणीं कुफ्फार म्हणजे कंठीरव नरस ओडेयरच

असावा. कारण या वेळीं म्हैसूरच्या बाजूस तोच सर्वांत प्रबल राजा असून आपला प्रदेश वाढविण्याचा प्रयत्नही तो करीत होता.

असो. या वेढ्याचें पुढें काय झालें याची कल्पना करतां येण्यासारखी आहे. खानखानानें हि. १०५४ व १०५५ या २ सालभर जी स्वारी कर्नाटकांत केली तींत त्यानें शत्रूचे ९ किल्ले घेतल्याचें सांगितलें आहे. तेव्हां पीशजंग हि. १०५५ च्या दुसऱ्या पावक्यांत जरी बाळापूरच्या वेढ्यांत अडकला होता तरी तो पुढें लवकरच सुटला असावा.

| | | |
|---|---|---|
| ले. १६ हि. १०५५<br>जुमादिलावल २१ | १ शि. | श. १५६७ आषाढ वद्य ८<br>इ. १६४५ जुलै ६ |

फर्मान हुमायून शर्फ सुदूर याफ्त आंकह खान आलीशान सआदतनिशान रफ़ीअ उल् कद्र वल् मकान लायक उल् इनायत वल् इहसान शायस्तह मराहिम बीपायान अन्व्ररखान वइनायत बीगायात शाहानह नवाझिश व इल्तिफ़ात खुसवानह सराफ़राझ व मुअझ्झझ बूदह बिदानद कह दरीं वला बअर्ज मुकद्दस रसीद कह बालापूर रा कुफ्फार फुज्जार शिकन्जह कर्देह अन्द लिहाजह हुक्म जहां मताअ व आलम मुत्बअ सादिर मी शवद कह बमुजर्रद वसूल ई फर्मान अजीम उश् शान दर साअत खुदरा बहवाली बालापूर रसानीदह दर दफ़अ गनीम साई शवद व ऊपरालह मर्दुम इझ्झत व रफ़अत दस्तगाह शुजाअत व शहामत इन्तिबाह झुब्दह दौलतखा(ख्वा)हान मुस्ततहम्राह खुलासह खैरअन्दीशान बिला इश्तबाह खान आलीशान सआदतनिशान रफ़ीअ उल् कद्र वल् मकान लायक उल् इनायत वल् इहसान पीशजन्गखान नुमायद अगर नौज बिल्लह चीझी वाकअ शवद जवाब आं किलअ दर अह्दह ऊस्त तादानद वर हुक्म फर्मान अश्रफ़ रवद तहरीरन फी २१ शहर जमादी उल् अव्वल सनह १०५५.

( समासांत ) पर्वानगी हुजूर अश्रफ़ अक्दस हुमायून अश्ला* मुहम्मदशाह → अंबरखान

* या व पुढील तीन अशा फर्मानांचा वरचा, मागच्या व उजव्या बाजूचा कोरा भाग कापून काढला आहे.

काफीर लोकांनीं सध्यां बाळापूरला वेढा घातला आहे असें समजतें. तरी हा हुकूम पोहोंचतांच बाळापुरास जाऊन शत्रूला दफे करण्याची खटपट करावी व तेथील पीशजंगखान याच्या लोकांचा तुम्ही उपराळा करावा. ईश्वर न करो, कांहीं कमजास्त घडलें तर त्या किल्ल्याची जबाबदारी तुमच्यावर(ऊ[1]) आहे.

१२

ले. १७ हि. १०५५ जमादिलावल २१ } १ शी. { श. १५६७ आषाढ वद्य ८ इ. १६४५ जुलै ६

फर्मानि हुमायून शर्फ सुदूर याफ्त आंकह मुकद्दम उल् अमासिल वल् इक्रान खुलासत उल् कबायिल वल् अय्यान झुब्दत उल् अश्बाह् वल् अक्रयान शुजाअत आसारी जूझारराव घान्तगह[2]

१३

ले. १८ हि. १०५७ सल १० } { श. १५६९ चैत्र शुद्ध १२ इ. १६४७ एप्रिल ६

मुहम्मदशाह → असदखान

आम्हांस असें समजतें कीं, आपले मुतालीक सध्यां सैन्याच्या कोठींत धान्य व इतर जिन्नस यांचा भरणा करणाऱ्या व्यापाऱ्यांना तऱ्हतऱ्हेनें त्रास देऊन त्यांपासून पैसा उकळतात. आपल्या खजिन्यांतून त्यांस तनखा व रतीब चालू आहे त्या अर्थी त्यांचें हें करणें योग्य नाहीं. तेव्हां आपणांस फर्मावितों कीं, आपल्या मुतालिकांना योग्य शिक्षा व तंबी पोहोंचविल्या शिवाय राहू नये व कोठाराच्या व्यापाऱ्यांना कोणताही उपद्रव न देतां त्यांनीं व्यापाऱ्यांपासून जें कांहीं घेतलें असेल तें सर्व आतांच परत करावें. जर कोणी पुन्हां असला प्रयत्न करील तर त्याचा भयंकर परिणाम होईल

---

१ ऊ चा अर्थ तो-ती-तं-असतां मी तुम्ही असा केला आहे. अनेक फर्मानांतून आज्ञा केलेल्या मनुष्याला तृतीय पुरुषी संबोधिलेलें दिसतें. वास्तविक तेथें द्वितीय पुरुषच अभिप्रेत असतो.

२ यापुढील सर्व मजकूर वरच्याच फर्मानाप्रमाणें असल्यामुळें त्याचे उच्चार व अर्थ या गोष्टी दिलेल्या नाहींत. त्या सर्व वरच्या फर्मानाप्रमाणेंच समजाव्या.

१४

हेंही फर्मान महत्त्वाचें आहे. याचा काल हि. १०५७ जिल्हेज २५ हा आहे. यापूर्वी म्हणजे हि. १०५६ च्या जमादिलावल महिन्याच्या पहिल्या तारखेस विजापुरी सेनापती मुस्तफाखान यानें कर्नाटकाची स्वारी सुरू केली होती. ती स्वारी या वेळींही सुरू होतीच. पण हि. १०५७ च्या मध्याच्या सुमारास बादशाही फर्मान आल्यामुळें मुस्तफाखान स्वारीचें काम असदखान व शहाजी या दोघांवर सोपवून विजापुरास परत गेला होता (शिवाजी निबंधावळी भाग २ पृ. ११९).

या फर्मानांत आलेला यशवंतराव याचें आडनांव दिलेलें नाहीं. शिवभारतांत शहाजीवर हल्ला करून त्यास पकडण्यांत यशवंतराव वाडवे नांवाच्या एक गृहस्थ असल्याचें नमूद आहे. तोच बहुधा हा असावा. हा पूर्वीपासून शहाजीच्या विरुद्ध वागत असावा. म्हणूनच बादशहाला विरुद्ध न वागण्याबद्दल यास ताकीद करावी लागली आहे.

या फर्मानांत शहाजीस महाराज, फर्जंद वगैरे सन्मानदर्शक जे शब्द लावले आहेत त्यांवरून शहाजीस विजापूर दरबारीं या वेळीं चांगली मान्यता होती असें दिसतें.

या फर्मानांत कन्वी ( सिंड, घाट ) हा तामिल शब्द आला असून सिंडीचें नाव जन्गमा असें आलें आहे. यांत एवढेंच दिसतें कीं, शहाजी या वेळीं सिंडीच्या संरक्षणासाठीं तिच्या जवळच तळ देऊन बसला होता.

| | | |
|---|---|---|
| ले. १९<br>हि. १०५७ जिल्हेज २५ | १ शि. | श. १५६९ पौष वद्य १२<br>इ. १६४८ जानेवारी ११ |

फर्मान हुमायून शर्फ सुदूर याफ्त आंकह मशहूर उद्द दौलत यसवन्तराव बइनायात बीगायात पादशाहानह मुस्तवसक व उम्मीद्वार बूदह बिदानद कह बिनावर हुकम अशरफ नव्वाब फलक जनाब गर्दूनरिकाब सल्तनतमदार अयालत व हुकूमत पनाह शौकत व हशमत दस्तगाह मुशिय्यद कवाअद कामगारी मुम्हिद मरासिम जहांदारी बद्र आली कद्र नाम्दारी गौहर कान बख्तियारी मक्सूद सलातीन कुब्बार मशहूर

खवाकीन आलीमिक्दार मुवास्सिस मवानी खिलाफत आसिफ रुत्वत अरस्तू हिक्मत अफ्लातून दानिश बत्लीमूस बीनिश दस्तूर अजीम उश शान जी अल इझ्झ वल करम वल इहसान नगीन खातिम जाह व तम्कीन मुदब्बिर अकालीम उल अर्जैन दुर्र दर्याए जूद नुक्तह दायरह वजूद मत्लअ खुर्शीद कमाल मन्बअ तार्ईद जू अल जलाल नूर हदीकह आफ्रीनश नूर हद्फह बीनिश आफ्ताब आस्मान मिहूतरी दुर्रए बुर्ज सर्वरी फराझिन्दह रायात उलुव्व मरातिब तराझिन्दह इयाय समुव्व मनाकिब शाह बैत कशीदह नुअ इन्सान मुहीत मर्कझ राफत व इम्तिनान कुदह खवानीन बुलन्द मकान साहिबह अआजम व अमाजिद दौरान वास्तह अम्न व अमान नव्वाब मुस्ततात्र मुअल्ला अल्काब खान बाबा बह ऊ नविश्तह अन्द कह बा जम्ई 'सवार व अहशाम बजन्गमा कन्वी रफ्तह बहे इझ्झत व शुजाअत दस्तगाह .उम्दह दौलतख्वाहान वफाकीश कुदहहवाख्वाहान खैरअन्दीश झुब्दत उल अमासिल वल अख्वान खुलासत उल अमासिल वल इक्रान रुक्न उद् दौलत उल काहिरह महाराज फर्झन्द शाहजी भोसलह मुल्हक शुदह बामहाराज यक दिल व यक जहत बूदह आसार दौलतख्वाही बजुहूर रसानद मी बायद कह अझ नविश्तह नव्वाब नाम्दार इझ्झ इलेह सर मूँ तजावझ न नुमायद बझूदीझूद बमहाराज खुदरा बरसानद कह दरीं मअनी इख्तियाद सराफ्राझ शुद दानद तह्रीरन् फी २५ शहर जू हज्जह सनह १०५७

*( समाप्त )........हुमायून अअला*

मुहम्मदशाह → यशवंतराव

आमच्या हुकुमाप्रमाणें नवाब खानबाबा यांनीं तुम्हांस लिहिलें कीं, " तुम्ही आपले प्यादे व स्वार यांसह जंगमा खिंडीपाशीं जाऊन महाराज फर्जंद शहाजी भोसले यांच्याशीं एकदिल व एकरूप होऊन दौलतीच्या सदिच्छेचे चिन्ह प्रकट करावें." तरी नामदारांच्या लिहिण्याच्या विरुद्ध एक केसभरही न जातां महाराजांपाशीं ( शहाजी ) पोहोंचावे. यांतच तुमचा जास्त उत्कर्ष आहे असें समजावें.

६५

ले. २० सु. १०४८ } { श. १५७० चैत्र शुद्ध९
हि. १०५८ रवल ७ } { इ. १६४८ मार्च २२

मुहम्मद शाह → हुद्देदार पेठ (बहुधा विजापुरांतील)

नारो विश्वनाथ पंडित यानें विनंति केली कीं, "पेठेंतील पूलाजवी (पे, वाव, लाम, अलीफ, जीम, ते, हे, ये,) चें बाबतींतील एक घर पूर्वी मला दिलें होतें. आतां मला फर्मान मिळावें." तरी उपर्युक्त घर नारो विश्वनाथ पंडित यास देऊन टाकावें.

१६

हें फर्मान त्याला काय सांगावयाचें आहे तें स्वतःच उत्तम तऱ्हेनें सांगत आहे. मला यांतील गावांविषयीं कांहीं खुलासा करावयाचा आहे. सातान्याच्याजवळ ५ कोसांच्या अंतरांत दोन सायगावें आहेत. एक सातान्याच्या पश्चिमेस २।३ कोसांवर पण सातारा तालुक्यांत असलेलें व दुसरें सातान्याच्या वायव्येस असलेलें जावली तालुक्यांतील. पैकीं या फर्मानांत सातारा तालुक्यांतील सायगावच विवक्षित आहे. मेढ्याला जवळ असें सायगाव सातारा तालुक्यांतीलच. या सायगाव जवळच वेळें हें गांव १ कोसावर आहे. वासोट्यापासून ७८ कोस अंतरावर वेळें नावाचें एक गाव आहे; पण येथें तें विवक्षित नाहीं. कारण हें दुसरें वेळें उपर्युक्त सायगावापासून सुमारें १० कोस अंतरावर येईल.

येथें मुसलमान बादशहानें गांवकऱ्यांविषयीं जी कळकळ दाखविली आहे ती अनुकरणीय नाहीं असें कोण म्हणेल ? रयतेकडे वसुलाची बाकी राहिली तरी दडपशाहीचे उपाय अमलांत न आणतां लोकांची समजूत घालून त्यांकडून वाजवी रक्कम वसूल करणें योग्य होतें असें बजावून साताऱ्याचा किल्लेदार मानकोजीराव यानें करविलेल्या लुटीबद्दल बादशहा त्याची चांगली कानउघाडणी करीत आहे. येथें अधिकाऱ्याच्या वर्तनाचें समर्थन न करतां अधिकाऱ्यास त्यानें केलेल्या दडपशाहीबद्दल उघड दोष देऊन बादशहानें रयतेची बाजू उचलून धरली आहे.

| | |
|---|---|
| ले. २१ सु. १०५० | श. १५७२ श्रावण शुद्ध ५ |
| हि. १०६० साबान ३ | इ. १६५० जुलै २२ |

मुहम्मदशाह →-माणकोजी नरसिंगराव हवालदार व कारकून किल्ले सातारा

आम्हांस असें समजलें कीं, मौजे सायगाव तर्फे मेढें किल्ले वासोटा येथील कुणबी स्वतःकडून वासोटा किल्ल्याच्या तरतुदीस

जावयाचे पैसे न देतां तुमच्या किल्ल्याच्या ( सातारा ) हद्दींत येऊन राहिले. तेव्हां सायगावच्या हुद्देदारांनीं तेथें येऊन पैसे मागितले; पण त्यांनीं न दिल्यामुळें त्यांचा सूड घेतला. त्या वेळीं तुम्ही येथे येथील हुद्देदारांचेबरोबर शिपाई देऊन त्यांस सायगावावर पाठविलें आणि त्यांची गायगुरें लुटून आणिलीं. जेव्हां ते लोक बाकी न देतां तुमच्या हद्दींत आले तेव्हां तुम्ही त्यांची समजूत घालून त्यांच्याकडून हिशेबी बाकी सायगावच्या हुद्देदारांस देवविणें योग्य होतें; तें न करतां तुम्ही उपर्युक्त वर्तन करून गाव खराब केलें हें केवढें धाष्टर्य ? आतां हा हुकूम पावतांच सायगाव येथील जें कांहीं लुटून आणलें असेल तें सर्वच्या सर्व परत देऊन सायगावच्या कुणब्यास त्या गावच्या हुद्देदारांच्या ताब्यांत द्यावें व कोणताही त्रास देऊ नये. या बाबतींत जर तक्रार आली तर त्याचा परिणाम चांगला होणार नाहीं हें खूप समजून असा.

१७

लें. २२सु. १०५१ } { श. १५७३ पौष वद्य १
हि. १०६२ मोहरम १२ } { इ. १६५१ डिसेंबर १७

मुहम्मदशाह→ हुद्देदार पेठ शहापूर मामले मुहम्मदपूर

राव अमीनराव ठाणेदार पेठ शहापूर यांनीं विनंति केली कीं, " तोफाच्या वातेरी ( कोट ) नजीक थोरल्या हौदाच्या बाजूस बाहेरच्या अंगास एक उघडें खिंडार आहे. तेथें चोरांना आश्रय मिळतो. ही गोष्ट हुजुरास कळविल्यावर हुजूरच्या हुक्माप्रमाणें पूर्वीचा जीर्ण कोट बाजूस करून ती जागा आंत घेऊन त्याबाजूस कोट बांधून मोकळी जमीन लोकांस विकून टाकून कोटास दरवाजा बांधला. त्या जमीनीवर लोकांनीं घरें बांधून ती जागा भरवराटीस आणली आणि ते लोक हुजुरास दीर्घायुष्य चिंतून तेथें रहात आहेत. त्या ठिकाणीं मी एक घर बांधू इच्छितों. तेव्हां जुन्या कोटाच्या १५० गज लांबीच्या भिंतीचे धोंडे व माती आणि ७० गज लांब व ४० गज रुंद अशी जमीन बक्षिस देण्याची कृपा करावी " विनंतीप्रमाणें त्यास उपर्युक्त गोष्टी दिल्या आहेत थोरला हौद आणि धर्मशाळा, वाडे व नवाबपूर यांच्या बाजूस असलेली मोकळी जागा, आणि जुना कोट व माळ जमीन गांवर कोट व दरवाजा बांधून तेथील जमीनीवर घरें, दुकानें व बाजार

बांधून पेठेची आबादानी करवावी म्हणजे उपर्युक्त रावाची सदिच्छा व्यक्त होईल[1].

१८

ले. २३ सु. १०६० } { श. १५८२ अधिक ज्येष्ठ शुद्ध १५
हिं. १०७० रमजान १४ } { इ. १६६० मे १४

अली आदिलशाह → अधिकारी व देसाई परगणे कोल्हापूर

रामकृष्ण नारायण यानें दरबारास विनंति केली कीं " कोल्हापूर परगण्याचा देशकुलकर्णी मयत झाला व त्याला कोणी वारस राहिले नाहींत. बऱ्याच दिवसापासून रुद्राजी कोन्हेरी अंबेटकर व चोंढो नरसिंह कुळकर्णी कसबे कोल्हापूर यांनीं गैरवारस असून देशकुलकर्णाचा ताबा घेतला आहे. कृपादृष्टी करून सदरहू कुळकर्ण त्यावरील हक्कांसह मला बहाल करून शिवाय वेतलूज येथील पाऊण तिनका जमीनीच्या बक्षिशीचें फर्मान करून यावें. म्हणजे मी रयतेस दिलासा देऊन या परगण्याची लावणी संचणी करण्याची खटपट करीन. " तरी सदरहू परगण्याच्या देशकुळकर्णाची मिरास वर सांगितलेल्या अटीवर रामकृष्ण नारायण यास इनाम देण्याची कृपा केली आहे. तेव्हां सदरहू कुळकर्ण रामकृष्ण नारायण याच्या ताब्यांत द्यावें व चालू ठेवावें. तसेंच देशकुळकर्ण दिल्याबद्दल घ्यावयाची शेरणीही माफ केली आहे.

१९

ले. २४ सु. १०६१ } { श. १५८२ फाल्गुन शुद्ध ७
हि. १०७१ रजब ५ } { इ. १६६१ फेब्रुवारी २५

अली आदिलशाह→वर्तमान व भावी अधिकारी व देसाई परगणे कोल्हापूर.

रामकृष्ण नारायण, देशकुळकर्णी परगणे कोल्हापूर, यानें विनंति केली कीं, " या परगण्याचें देशकुळकर्ण त्यावरील हक्कांसह व अर्धा चावर

१ या ठिकाणीं राव अमीनराव यानें जी जागा मागितली त्या बाजूस प्रथम च वस्ती झाली होती. तेथें तर अमीनरावास जागा मिळालीच पण त्यास आणखीही एके ठिकाणीं अशीच वस्ती करावयास सांगितलेलें दिसतें. नाहीं तर जेथें पूर्वी वस्ती झाली होती असें अमीनराव स्वतः सांगतो त्याच जागीं बादशाह आणखी वस्ती करण्यास सांगत आहे असें होईल. विशेषतः धर्मशाळा, वाडे व नवापूर या शब्दांवरून बादशाह अमीनरावास जेथें वस्ती करावयास सांगत आहे तो भाग जेथें अमीनरावास जागा मिळाली त्याभागाहून निराळा होता असें दिसतें.

जमीन इनाम म्हणून मजकडे चालू आहे. हल्लीं या परगण्याचे मोकाशी अडथळा करून हकलवाजिम्यांचा वसूल करूं देत नाहीत. हक वसूल करण्याबद्दल मला फर्मान मिळावें." तरी रामकृष्ण नारायण यास अर्धा चावर जमीन व इतर हक्क व लवाजिमे इनाम दिले आहेत. त्यास ते भोगू द्यावे.

२०

| | |
|---|---|
| हे. २५ सु: १०७१<br>हि. १०७१ जिल्हेज २३ | श. १५८३ श्रावण वद्य १०<br>इ. १६६१ आगष्ट ९ |

अली आदिल शाह → वर्तमान व भावी अधिकारी व देसाई परगणे कोल्हापूर.

रामकृष्ण नारायण, देशकुलकर्णी परगणे मजकूर, यानें विनंति केली कीं, "या परगण्याच्या देशकुलकर्णाची मिरास आपल्या फर्मानाप्रमाणें मजकडे चालू आहे. हकलवाजिमे व इतर इनाम या विषयीं फर्मान मिळावा." तरी त्यास हकलवाजिमे व इतर बाबी वंशपरंपरेनें भोगू द्याव्या.

२१

| | |
|---|---|
| हे. २६ सु. १०६२<br>हि. १०७२ रजब १५ | श. १५८३ फाल्गुन वद्य २<br>इ. १६६२ फेब्रुवारी २५ |

अली आदिलशाह→फाजल अफ्जलखान मुहम्मदशाही हवालदार व मुहम्मद मुलकी ठाणेदार व कारकून किल्ले परळी

मौजे बोरगाव परगणे वाई येथील कुळकर्णी नारो विश्वनाथ, यानें दरबारास विनंति केली कीं, "मौजे कामेरी किल्ले परळी येथील अर्धा चावर जमीन आदिलशाही अंबाजी घोरपडे याच्या खुर्दखताप्रमाणें इनाम चालू आहे. आपलें फर्मान मिळावें." तरी सदरहू जमीन तीवरील हकांसुद्धां उपर्युक्त गृहस्थास इनाम देण्याची कृपा केली आहे. तेव्हां ती जमीन त्याचे ताब्यात देऊन त्याजकडे चालू ठेवावी.

---

१ हकलवाजिम्यांची माहिती वरून कर्यात कोल्हापूर मधील ६२ गावांतून सुमारें १८० होन सदरहू गृहस्थास मिळत असत असें दिसतें.

२ फर्मानांतील गावें व नकदी मिळकत यांची बेरीज ६२ गावें व ३३४१ होन इतकी भरते.

२२

ले. २७ } { श. १५८५ श्रावण शुद्ध ९
हि. १०७४ मोहरम८ } { इ. १६६३ आगस्ट २

अली आदिलशाह → राव अमीनराव

अमीनराव यांनीं जाणावें कीं, शर्जाखान[1] सरहवालदार शहर अहसनाबाद[2] (कुलबुर्गा) याच्या सांगण्यावरून शहराची तयारी (इस्तअदाद) व मौप (=?) या साठीं हुजूरकडून ८५० होनांची थैली पाठविली आहे. तरी हा पैसा व पूर्वी त्या साल्यावर जमा असलेला पैसा, तसेंच मदत व मौप या निमित्त या शहराकडे लावून दिलेल्या दोन गांवांमधून झालेला वसूल यांचा अहवाल अब्दुल मुहम्मद[3] याजकडे पाठवून द्यावा.

२३

ले. २८ मु. १०६५ } { श. १५८६ फाल्गुन शुद्ध १
हि. १०७५ रजब सलख[4] } { इ. १६६५ फेब्रुवारी ६

अली आदिलशाह → वर्तमान व भावी अधिकारी आणि देसाई परगणे कोल्हापूर

रामकृष्ण नारायण देशकुळकर्णी कर्यात हवाले परगणे कोल्हापूर, यानें विनंति केली कीं, "वरील कर्यातीच्या देसकुळकर्णाची मिरास त्यावरील हक्कांसह हुजूरच्या फर्मानाप्रमाणें मजकडे चालू आहे. कोष्टयाच्या दर

१ मोगल व विजापूरकर यांच्या युद्धांत पुढें प्रसिद्धीस आलेला सरदार शर्जाखान हाच येथें विवक्षित असावा. याच्याशिवाय दुसरा शर्जाखान या वेळीं विजापूरच्या दरबारांत नव्हता.

२ कुलबुर्गा शहराला अहसनाबाद म्हणत हें कांहीं बहमनी पादशहांचीं कुलबुर्गा येथें पाडलेलीं नाणींच सांगत आहेत. बहमनी राज्याचा संस्थापक अलाउद्दीन याचें नांव हसन असल्यामुळें वास्तविक हसनाबाद असें नांव असावयास पाहिजे. पण आज अहसनाबाद असें नांव सांपडतें. हसनाबादचें अहसनाबाद कसें झालें हें समजत नाहीं.

३ हा यावेळीं विजापूरचा पादशहा अली आदिलशहा याचा मुख्य प्रधान होता.

४ शेवटची तारीख सांगण्यासाठीं येथें अंक किंवा अंकवाची शब्द न लिहितां सलख म्हणजे महिन्याची अखेर असा शब्द लिहिला आहे. अशा प्रकारचे उल्लेख फारसे आढळत नाहींत.

मागामागें दरसाल पाव टका घेण्याची वहिवाट असतां ६ चितलच[1] मिळ-तात. ( पूर्वीप्रमाणें वर मागामागें पाव टका मिळण्याची ) कृपा व्हावी." तरी उपर्युक्त रामकृष्ण नारायण यास दरसाल दर मागामागें पाव टका मिळण्याची व्यवस्था करावी.

२४

ले. २९ सु. १०६५ } { श. १५८६ फाल्गुन शुद्ध १
हि. १०७५ रजब सल्ख } { इ. १६६५ फेब्रुवारी ६

अली आदिलशाह→ अधिकारी व देसाई परगणे वाई

जयरामभट बिन हरिभट राहणार कसबे वाई यानें विनंति केली कीं, "वाई येथें पाटस्थल १० बिघे व मौजे सिहली[2] संमत कोरेगाव[3] येथें गावाजवळ पाटस्थळ १० बिघे व थोरल्या न्हावी[4]च्या सीमेजवळ अर्धा चावर अशी एकंदर अर्धा चावर २० बिघे जमीन मोकाशाच्या सुर्द खताप्रमाणें मजकडे इनाम चालू आहे. कृपेचें फर्मान मिळावें." तरी विनंती-प्रमाणें वरील जमीन तीवरील हकांसुद्धां सदरहू गृहस्थास इनाम दिली आहे.

२५

ले. ३० सु. १०७५ } { श. १५९६ फाल्गुन शुद्ध १५
हि. १०८५ जिल्हेज १३ } { इ. १६७४ मार्च १

अली आदिलशाह → देसाई परगणे कागल

*हरी अमीनराव मजलसी हे सात असलेलें, मौजे जमगांव, कर्यात मुरगूर, परगणे कागल,* हें गांव राव दियानतराव मजलसी यास तंबाकू, भेट, करगोटा व इनाम याखेरीज इतर हकांसह इनाम दिलें आहे. तरी तें त्याच्या ताब्यांत देणें.

---

१ येथें टक्का व चितल असे दोन नाणकवाची शब्द आले आहेत. येथलि टक्का व चितल याच्या संबंधावरून ६ चितल हे पाव टक्क्याहूनही कमी असावेन असें दिसतें. कदाचित् १२ चितलांचा पाव टक्का होत असेल.

२ या नावाशीं सदृश असें न्हावीजवळ एकादें गाव असल्याचें दिसत नाहीं.

३ पूर्वी कोरेगाव हल्लींप्रमाणें तालुक्याचें मुख्य ठिकाण नसून वाई तालुक्यांतील एका भागाचें ठिकाण होतें ( पहा राजवाडे खंड २० पृ. २२८–२९ ).

४ न्हावी हें कोरेगाव संमतेंत मोडत असल्याचें दिसतें ( सदर).

# ६ बीरवाडीचे देशमूख व चंद्रराव मोरे वगैरे.*

( श्री. ग. ह. खरे व श्री. वि. वा. जोशी )

प्रस्तुतचे तीन फारसी मराठी कागद बीरवाडी येथील श्री. बापूराव देशमूख यांजकडील आहेत. यांपैकीं क्र. १ व ३ नक्कल असून क्र. २ हा अस्सल आहे. फारसी व मराठी नकलांमध्यें बऱ्याच चुका झाल्या आहेत. २ रा कागद असल असूनही अतिशय जीर्ण झाल्यामुळें त्यांतील मजकुरांतही खंड पडले आहेत. नक्कलकारानें महत्वाच्या चुका केल्या आहेत हें फ़ारसी व त्याचें मराठी रूपांतर हीं ताडून पाहिलीं असतां सहज समजून येईल. तरीही कागद महत्वाचे असल्यानें प्रसिद्ध करीत आहों.

१

सु. ३१ सु. १०४४ } नकल मुताबिक { श. १५६६ भाद्र.शुद्ध १५
हि. १०५४ रजब १४ } असल अस्त { इ. १६४४ सप्टेंबर ६

हू-अल-ज(ल)लील

अल्मुल्कोलिल्लह

मुहर पादशाह

बीजापूर

फर्मान हुमायून शर्फ सुदूर याफ्त वजानिब माल पटेल व बाजी ( बअजे ) अधिकारी तपह बिरवारी किलअह राहेर आंकह शुहूर सनह अर्बअ अर्बईन व अल्फ़ दर्रों विला अरीजअह ऊ मुतजम्मन अहवाल नमक-मेहलाली खुद व बद-अदाई शेख इब्राहीम व सय्यद कपर (कबीर) लश्करियान व कुश्तह शुदन आंहा व तअरीफ़ इख्लास मात्र शेख अली माजी व अहवाल बद-सुलूकी रहीमखान हवालदार किलअह मज्कूर मसूंल दाश्तह बूद अज़ मआरिफ़त जासो रूदो [हाजिब*] मुकद्दम–उल–इम्साल चन्द्रराव रसीद्ह हमगी अहवाल बदर्गाह जहां-पनाह रोशन व मब्रहन गर्दीद बिनाबरां एतालदारी किलअह मज्कूर ब शेख अली मुशारुन-इलैह मर्हमत

* पा. स. १५।१८५३
ऐ. फा सा. मं. १–५

१ ह मायना.

फर्मूदह शुदह अस्त मुशारुन-इलैह रवानह शुदह मी आयद बायद कह—फर्मान सआदत-निशान बहमह अव्वाब खातिर-जमअ नमूदह दर दौलत-ख्वाही दर्गाह आस्मान-जाह साबित-कदम व रासिख-दम बूदह दिलासाए रिआय नमूदह मामूरी (मअ्मूरी) तपह विलायत किलअह मज्कूर नमूदह बजांफ हलाल-ख्वारी बजुहूर आउर्दह दर रजा व तलब हवालदार मूमा-इलैह बूदह बाशद कह बाइस सर्फराझी ऊ अस्त बर हुक्म फर्मान अश्रफ रवद तहरीरन फी राबअ अशर शहर रजब-उल-मुरज्जब सनह १०५४

[मराठी रूपांतर*]

फर्मान हुमायून शरफ सदूर याल्फ बजानेद(ब) माल पटेल व बाजी आधिकारी तो बीरवडी किले रायेरी ऊंकी आर्ज सुा सन आर्बेन व अलफ दरी वख्त तुवा आरजि लिहिले होते जे आपुले हलालनमकी व सेख इभराइमाचे बद आमल व सेद कबीर मारिले व तारीफ इजतमाव सेख आली हावलदार माजी बदतु( सु )लूकी रहिमान ( फा.रहीम )खान हावल्दार किले मजकूर लिहिले होते ते आसो रद्दो मोकदमल इम[साल] आपले चंदररायाने हेजिबाचे गुजारतीने पावले व तमाम आहवाल दरगाह जाहाक(प)नाह हीं रोशेन जाहाले त्यावरी किले मजकूरचे हवल्दारी सेख आली मशारनलेसी मर्हमत फर्माऊन पाटविले आसे मशारनिले रवाना होउनू ने येतो तरी तुवा फर्मान सादत निशान पावतांची तमाम बाबे खातीर—जमा करुनू दरगाहचे दौलतखोहीमध्यें साबित कदम व रासिखदम आसोन रयेताचे दिलासा करून तपे विलाईत किले मजकूरचे माहामुरी करून जियाबा(दा) हलालखोरी जाहीर करणें हवालदार मोमिनिलेचे रजातलब मध्यें आसणें तुझे सरफराजी आहे फर्मान द( व )रहुकूम आमल करणे छ १४ रजेब आल मुजद ( उल-मुरज्जब ) सन येक हजार १०५४ पा हुजूर खुरशेद जहूर आशरफ आकदस हुमामुस ( यून )[२]

---

१ न गाळावा.

२ हा कागद म्हणजे विजापूरच्या बादशहाकडून रायरी किल्ल्याखालीं असलेल्या बीरवाडी तप्याचे अधिकारी व माल पाटील यांस आलेलें फर्मान होय. या माल पाटलाचा एक कागद पूर्वी प्रसिद्ध झाला आहे. तो शक १५७३ चा आहे. त्यांत माल पाटील चंद्ररायाविरुद्ध शिवाजीकडे तक्रार करीत आहे. शिवाजीनें आश्वासन दिल्यामुळें तो शिवाजीकडे गेला आहे, हें पत्र श. १५६६ चें आहे. या वेळीं चंद्र-

२

ले.३२ मु. १०४६ } [ १ शि.* ] { श. १५६७–६८ इ. १६४५–४६

बजानिब माल पटेल व अधिकारी तपह बिरवादी किलअह राहेर तहरीर याफ्त आंकह शुहूर सनह सित्त अर्बईन व अल्फ दर्रीं विला रोशन गर्दीद कह खबर मुहमिल तर्गीर हवालदारी किलअह मज्कूर बउन्वानी कह ब फर्झन्द हवालदार बन्दर मैमून मुस्तफाबाद मन्सूब मी शवद बर्वास्तह दर तलब बतहसील चीझी[न*]कर्दह अस्त अन्दाझह ऊ चीस्त चूं हवालदारी किलअह मझ्बूर ब इझ्झत माब फतह मुल्क मुकर्रर व मुस्तकीम अस्त अक्नून बायद कह हवालदारी ब[फतह*]मुल्क मुशारुन-इलैह मुकर्रर दानिस्तह दर जब्त व मुआनिअत व अम्र मुशारुन-इलैह साबित–कदी-(द)म बूदह बाशद अगर अहयानन झर्रह हर्कत अझ्र जाहिर शवद म ज(स)झाए खुद ख्वाहद शुद दर्रीं बाब ताकीद कुल्ली शनासन्द [शि*] मुरत्तब शुद

[ मराठी रूपांतर* ]

बजानेब माल पटेल आदिकारी तों बरवाडी किले राईर ताहरीर यात्फ ऊंकी अज सुा सन सीत आरबैन अलफ दरीविला रोशेन जाह्ले...

राय व माल पाटील यांचें सत्य आहे. माल पाटलाची विनंति चंद्ररायाचा हेजीब जास्तो रुझो यानेंच पादशहाच्या कानांवर घातली आहे श. १५७३ व श. १५६६ या दोन वेळचे चंद्रराय निराळे आहेत, हें मात्र येथें ध्यानांत ठेविलें पाहिजे. कदीम चंद्रराय श. १५७१ पूर्वी थोडेच दिवस वाला असावा. नवीन चंद्रराय व माल पाटील यांचें कां बिनसलें होतें याचें कारण वर उल्लेखिलेल्या पत्रांत दिलें आहे. या पत्रांत माल पाटलानें स्वतः एकनिष्ठ कसे आहों, शेख इब्राहीम व सय्यद फकीर ह्यांनीं स्वामिद्रोह केल्यामुळें ते कसे मारले गेले, तसेंच किल्ल्याचा जुना हवालदार शेख अली हा कसा चांगला होता व हल्लींचा हवालदार रहीमखान हा कसा बदफैली आहे वगैरेविषयीं बादशहास माहिती दिल्यामुळें बादशहानें पुन्हां शेख अली यास हवालदारी दिल्याचें व माल पाटलानें त्याच्या हुकमतींत वागण्याबद्दल या पत्रांत सांगितलें आहे. तसेंच रयतेस दिलासा देऊन बीरवाडी तर्फाची भरभराट करण्याबद्दलही या पत्रांत सांगितलें आहे.

कारी किले मजकूरचे बंदर मैमून मुस्तफा[बाद]......हवालदाराचे लेकासी ......केतेक......गैरवाका......ताहसील सरळ केले[1] .........

३

ले. ३३
जु. ४५ जवल २४

श. १६२३ आश्विन वद्य ११
इ. १७०१ आक्टोबर १६

सिक्कह खादिम शरह
याकूतखानजीव

नकल

गर्ज अझ ई नविश्तह आं कह मन कह तानाजीराव दरेकर व गैरह जील मुलाजिमह सर्कार अमारत व अयालत पनाह———ईम इक्रार मी नुमायम (ईम) बरीं मानी (मअनी) कह बापूजी वल्द साबाजीराव देसमुख तपह बिरवाडी गनीम लयीम नोकर बूद व बहम्राह शकावत पैवन्द रामचन्द दर मुल्क पादशाही ऊ गर्दीदह व दस्तगीर अहशाम इस्लाम शुदह ———खान साहिब ऊरा दर कैद फर्मूदन्द दरीं वला मायां जामिन बापूजी शुदह अझ कैद रेहानीदह दर सर्कार मस्तूर मुलाजिम कुनानीदीम व मूमा-इलैह बर जिम्मह खुद मुब्लिग सह४(३) हझार व यक सद व पिन्जाह रूपियह बतरीक मुसादिरह कबूल नमूदह अस्त वाजिब-उल- अदाए सर्कार अस्त बिनाबरां मायां नविश्तह मी दहम ( दहीम ) कह अगर मूमा-इलैह फरारी(र) शवद आवर्दह हाजिर नुमाईम मायां बइत्तिफाक यक दीगर बिला उज्र वासिल दाद[ह*]खाहीम लिहाजा ईं चन्द कलमा बतरीक मुचल्कह जामिनी मुसादिरह नविश्तह दादह शुद कह सानी-उल-हाल हुज्जत बाशद तहरीर फी-अत-तारीख बीस्त व चहारुम शहर जमादी--उल--अव्वल सनह चहल २५ (४५) व पन्ज जुलूस मुअल्ला

१ हें पत्र फर्मान नसून दुय्यम मर्तबेच्या अधिकाऱ्याचें ताकीदपत्र आहे. यांत किल्याचा जुना हवालदार दूर करून फत्ते मुल्क नांवाच्या नवीन गृहस्थास रायरी किल्याची हवालदारी दिल्याचें सांगितलें आहे. ही गोष्ट माल पाटील व इतर यांस माहीत असून त्यांनीं वसूल करण्याची कांहींच खटपट केली नाहीं; याबद्दल त्यांना दोष देऊन, यापुढें वरील हवालदाराच्या हुकूमांत राहण्याबद्दल बजाविलें आहे.

[ मराठी रूपांतर.* ]

छ २४ माहे जमादिलावल सन ४५ हजीर जामिनी बो तानाजी द्रेकर वगैरा मो १० नोकर सरकार मलाजीम सरकार येकरार ऐसाजे बीजामिनी बापूजी बिन साबजीराऊ देसाई ता वीरवाडी दरी विला सरकारी नोकर जाला यांसि आपण हजीर जामी [ न ] आसो जाई पळे तरी हजीर करून देईन हजीर न होईं तरी नफर मारास खंड देखील भता रुपये ३१५० तीन हजार दीडसे रुपये बिला उजूर वसूल देईन[1] हे लिा हजीर जामिनी सही जामिनी बितपसील नो १०

| मराठे लोका | परवरील नाउलकर |
| --- | --- |
| १ तानाजी वलद लखमाजी द्रेकर | १ कोंडनाक वा लखमनाक जाविलकर. |
| १ लक्ष्मोजी वा आनाजी माहाडिक | १ देवनाक वा नाऊनाक |
| १ जीवजी वा भीवजी चांदलेकर बारगीर | १ बाबानाक वा येसनाक |
| १ हरजी वा भिकाजी देव्हरकर जमातदार | १ सोननाक वा जाननाक |
| १ संभाजी वा कानोजी कोकाटे बारगीर | १ गवरनाक वा लखनाक |
| ५ | ५ |

---

१ हा कागद औरंगजेबाच्या ४५ जुलुसचा म्हणजे शक १६२३ चा आहे. वीरवाडी तप्याचा देशमुख बापूजी साबाजीराव हा वास्तवीक औरंगजेबाचा नोकर असतां रामचंद्र नांवाच्या दुसऱ्या मिळाला. यामुळें इकडील सैन्यानें त्यास पकडून आणलें व याकूबखानानें त्यास कैदेंत ठेविलें. तो सरकार चाकरी वगैरे, पळून जाणार नाहीं, गेल्यास तो स्वतः किंवा आम्ही सरकारांत ३१५० रुपये देऊं इत्यादि प्रकारें सांगून व जामीन घेऊन १० नोकरांनीं वरील देशमुखास सोडविलें आहे. येथें दुसरे रामचंद्र म्हणजे रामचंद्रपंत अमात्य असणें शक्य आहे. कारण? रामचंद्रपंत जिंजींत असून महाराष्ट्रांतही होता. ( पहा पुरंदरे दप्तर भाग १ ले. ३ )

# ७ कारी–जेधे.*

( ग. ह. खरे )

१

ले. ३४ }
सु. १०२८ }

[१ फारसी शिके *]

{ श. १५४९–५०
{ इ. १६२७–२८

अझ दीवान रस्तखानह खास बजानिब कारकुनान हाल व इस्तिक्बाल अमानत· व अझ जहत मुकासाए तपह रोहिरह बिदानन्द कह शुहूर सनह समान इश्रीन व अल्फ हाजिब कान्होजी देसमुक तर्फ भर ( भोर ) तपह मज्कूर दर बन्दगी हजरत मअ्लूम नमूद कह देसमुक तर्फ मज्कूरस इसाबत मौजअ अन्बोरह बा कुलबाब व कुलकानून गामगानेह हक लवाझिमह व शहनह सारी व मौजअ कारी बाबत महसूल दोबीस्त व हफ्ताद व शश तन्कह व १२ दामं दर दीवान वसूल मी शवद व रोगन गन्जद बर निसबत बअजे देहादेह मज्कूरस बदल इन्आम देसमुक पालक अस्त व बकानून कोबलादरा इन्आमत व हक लवाझिमह

२

ले. ३५ सु. १०३० } हू-अल खलील { श. १५५२ अ. आ. शु. ५.
हि. १०३९ जिल्काद १२ } अल्मुल्कोलिल्लह { इ. १६३० जून १४

फर्मान हुमायून शर्फ सुदूर याफ्त बजानिब देसायान तपह रोहिरह आं कह शुहूर सनह सलासीन व अल्फ तपह मज्कूर बाबत कोवाजी खरारह दर वज्ह इस्तिआनत मुकद्दम-उल-इम्साल गन्गाजी मअ कुलबाब महंमत दहानीदह शुदह अस्त मी बायद कह तपह मज्कूर दुन्बालह नुमायन्द व दर कब्ज व तसर्रुफ मूमा-इलैह बाझ गुजारन्द बर हुक्म फर्मान अश्रफ

* पा. स. १२।१८५२

१ टके व दाम यापद्दल मराठी मजकुरांत टके २७६।. असें लिहिलें आहे ( मा. सं. २ पृ. २०७ ). १२ दाम म्हणजे जर पाव टका, तर ४८ दामांचा टका झाला.

२ यापुढें मज्कूर लिहिलेला नाहीं. फारसी लेखन अर्धवट ठेविलें आहे. या खालील मराठी मजकुरासाठीं शिवचरित्रसाहित्य खंड २ ले. २०१ पहा.

रवान्द[1] तहरीर फी १२ शहर जू-अल-कअदह सनह १०३९

[समासांत*] पर्वानगी हुजूर अश्रफ अक्दस हुमायून अअला[2]

## ३

ले. ३६ } [ ५ फा. शि.* ] { शं. १५५५ मार्गशीर्ष शु. ११
सु. १०३४ } { इ. १६३३ डिसेंबर १

अझ दीवान रख्तखानह खास बजानिब कारकुनान हाल व इस्तिक्बाल व देसमुकान तपह रोहिरह शुहूर सनह अर्बअ व सलासीन व अल्फ कानोजी जेदह तर्फ भोर तपह मज्कूर —— इन्आम अज्रा ( = अझ राह ?) मर्हमत मौजअ कोरी ( कारी ) तपह रोहिरहं बर हुक्म हिन्दवी अमल नुमायन्द

[ या खालील मराठी मजकूर म्हणजे शि. च. सा. खं. २ ले. २०५*]

## ४

ले. ३७ } [ ३ फा. शि.* ] { श. १५५८ श्रावण व. १२
सु. १०३७ } { इ. १६३६ आगस्ट १७

अझ दीवान रख्तखानह खास बजानिब कारकुनान व देसमुकान

---

१ हें विजापुरी फर्मान असून यांत कान्होजी देसायास मोर तथा गंगाजी [खराडे?] याचे ताब्यांत देण्यास सांगितलें आहे. अर्थात कान्होजी पूर्णपणें विजापूरकरांचा नायेदार बनला होता असें दिसतें. यांत आलेला गंगाजी, मराठे कुलोत्पन्नच असेल काय ? कान्होजी श. १५५५ च्या सुमारास पुन्हा निजामशाहीकडे गेला असावा किंवा त्यानें दोन्ही दगडींवर हात नाहीं ठेवला असला पाहिजे. कारण श. १५५५ त त्यास निजामशाहींतून कारी गांव पुन्हा इनाम मिळाल्याचें दिसतें (शि.च. सा. खं. २ ले. २०५ व ऐ. फा. सा. ले. ३६ ).

२ या फर्मानाखालील मराठी मजकूर म्हणजे शिवचरित्रसाहित्य २ रा खंड २०४ चा लेखांक आहे.

३ संपूर्ण मिति शि. च. सा. खं. २ ले. २०५ वरून घेतली आहे.

४ येथें फारसी मजकूर लिहिण्याचें अर्धेच सोडून देऊन वर दिलेला शेरा लिहिला आहे.

तपह रोहिरह बिदानद शुहूर सनह मअ सलासीन व अल्फ[1] वर हुक्म हिन्दवी अमल साझन्द

५

ले.३८ सु. १३०६[2] } हू-अल-खलील { श. १५५८ आश्विन शुद्ध ५
हि.१०४६ जवल ४ } अल्मुल्कोलिल्लह { इ. १६३६ सप्टेंबर २४

फर्मान हुमायून शर्फ सुदूर याफ्त बजानिब देसमुकान तपह रोहिरह आं कह शुहूर सनह सितह सलास मिअतह व अल्फ[3] अझ राह मराहिम पादशाहानह व फर्त अवातिफ़ खुसरवानह तपह मज्कूर बइस्तिकामत सह कस रसीदह

| | |
|---|---|
| निस्फ तपह दर वज्ह | दर निस्फ दो कस इस्महमा |
| जागीर गोन्दाजी सिन्दा | मान्कोजी व वीरसिन्गजी |

मअ कुलबाब मर्हमत फर्मूदह दहानीदह शुदह अस्त मी बायद कह तपह मज्कूर दुन्बालह नुमायन्द व दर कब्ज व तसर्रुफ मुशारुन-इलैह बाझ गुजारन्द तादानन्द वर हुक्म फर्मान अश्रफ रवन्द तहरीर फी चहारुम शहर जमादी-उल-अव्वल सनह १०४६ [ समासांत* ] पर्वानिगी हुजूर अश्रफ अक्दस हुमायून अर्फअ अअला बाअलाम कम्तरीन फिद्वियान रकान

[ सारांश* ]

मुहम्मदशाह →तर्फे रोहिड्याचे देशमुख

या तप्यापैकीं अर्धा भाग गोंदाजी सिंदे यास व बाकीचा अर्धा माणकोजी व वीरसिंगजी यास जागीर दिला आहे. तरी उपर्युक्त तपा त्यांचे ताब्यांत देणें.

---

१ येथें फारसी मजकूर लिहिणें अर्धवटच सोडून देऊन 'वर हुक्म हिन्दवी अमल सासन्द ' हें वाक्य लिहिलें आहे. त्याखालीं मराठी मजकूर आहे. ( पहा रामदास रामदासी अंक १२१, श्री ऐतिहासिक कागदपत्रें, पृ. ६, ले. ६ ) रामदास रामदासींनी मराठी मजकुरास दिलेली मिती एका दिवसानें चुकली आहे.

२ हा व पाठीमागील क्र. ३४,३६ हे तिन्ही कागद निजामशाही फर्मानें आहेत हें ध्यानात ठेवण्यासारखें आहे.

३ येथें लेखकाला सुहूर १०३६ हा सन सांगावयाचा होता पण चुकीनें १३०६ सन सांगणारे शब्द वापरले गेले आहेत.

६

ले. ३९ } हू–अल–खलील { श. १५५५ माघ वद्य३०
हि. १०४३ साबान २८ } अल–मुल्कुलिल्लह { इ. १६३४ फेब्रुवारी१७

[फा. शि. *]

फर्मान हुमायून शर्फ सुदूर याफ्त बजानिब हवालहदार व सर–नौबत व नायकवारियान किल्अह मूरबदेव आंकह आंचह बजहत ज–खीरह व इस्तअदाद किल्अह मज्कूर [व*] देहा ( देहहा) तहत मायह–ताज अजवक्त मलिक अम्बर व निज़ामशाह मुकासा रवानस्त बदां मूजब मुकर्रर व मुस्तकीम दाश्तह शुदह अस्त व बह जम्इयत कह मुकासा दादह अन्द नीज़ करार दाश्तह ईम बहाल खुद मुकर्रर दानिस्तह कवी–दिल बूदह बसर–गर्मी तमाम बर जाद्दह दौलत–ख्वाही रासिख–दम व साबित–कदम बाशद कह मूजब सर–बुलन्दी ऊस्त तादानद तहरीरन फी २८ माह शअबान सनह १०४३

[समासांत*] परवानगी हुजूर अश्रफ अकदस हुमायून अअला

सारांश.

बादशहा → मूरबदेव (राजगड) किल्ल्याचा हवालदार, सरनौबत व नायकवाडी यांस

किल्ल्याची डागडुजी व दाणागोटा रसद वगैरे यासाठीं मलिकंबर व निजामशहा यांच्या कारकीर्दीपासून जो मुकासा चालूं आहे व त्या मुकाशास जी जमेत दिली आहे ती जमेत व तो मुकासा आजही मुकरर आहे असें जाणावें व दौलतीच्या सदिच्छेच्या मार्गावर दृढ असावें.ता. २९ साबान सन १०४३

७

ले. ४० सु. १०३७ } हू–अल–खलील { श. १५५९ आषाढ वद्य ९
हि. १०४७ सफर २३ } अल–मुल्कुलिल्लह { इ. १६३७ जुलै ६

फर्मान हुमायून शर्फ सुदूर याफ्त बजानिब कानोजी जेधे देसाई किल्अह रूहीरह आंकह अज़ शुहूर सनह सब्अ सलसीन व अल्फ दरीं–विला बदर्गाह अर्श–इश्तबाह रोशन गर्दीद कह ऊ अज़ सिद्क–निय्यत व नमक–हलाली गायत तरद्दुद व मशक्कत जां–सिपारी दर मस्लहत बाद–

शाही बजा आउर्दह व मी आरद व ई मअना मुस्तहसन खातिर अश्रफ शुदह व शाद-बाश अक्नून बायद कह बमुजर्रद वसूल फर्मान वाजिब-उल-इज्आन दर तस्खीर किल्अह व दफअ हरामखोरान साबित-कदम व सर-गर्म बूदह नमक-हलाली व फिद्वियत बज़ुहूर रसानद कह सर-अन्जामी व सर-अफ्राझी ऊ फर्मूदह ख्वाहद शुद तादानन्द तहरीरन फी २२ शहर सफर सनह १०४७

[समासांत* ] परवानगी हुज़ूर अश्रफ अक्दस अर्फअ हुमायून अअला बा-अलाम खान आली-शान सआदत-निशान रफीअ-उल-कद्र बुलन्द्-मकान इस्लामखान वझीर हुकूमत

सारांश.

बादशहा → कान्होजी जेधे देसाई किले राहिडा.

सध्यां दरबाराच्या ध्यानांत आलें कीं, कान्होजी यानें सद्धेतु व निष्ठा यांयोगें बादशाही मसलतींच्या बाबतींत प्राणार्पण करण्याचे कष्ट व अतिशय उपाय केले व करीत आहे. हा अर्थ आमच्या मनास पसंत पडला व सुख झालें. तेव्हां आतां हें फर्मान पोहोंचतांच किल्ला घेणें व हरामखोरांना दफे करणें यांत दृढ राहून नमकहलाली व चाकरी व्यक्त करावी म्हणजे व्यवस्था ( इनामाची ? ) व उत्कर्ष या बाबतींत हुकूम होईल. ता. २२ सफर सन १०४७

८

| | | |
|---|---|---|
| ले. ४१ सु. १०३८<br>हि. १०४७ जखर ६ | हू-अल-खलील<br>अल्मुल्कुलिल्लह | श.१५५९कार्तिक शुद्ध ७<br>इ. १६३७ आक्टोबर १५ |

[ फा. शि.* ]

फर्मान हुमायून शर्फ सुदूर याफ्त बजानिब कार्कुनान तपह रोहीरह आंकह अझ शुहूर सनह समान सलासीन अल्फ दरीं वला बदर्गाह वाला-*जाह रोशन गर्दीद कह कानोजी जधा देसाई तर्फ भोर किल्अह मज्कूर* मशक्कत नमूदन तक्सीर न कर्द व मुत्मर्दांरा दफअ साख्तह बिना बरों अझ राह मराहिम पादशाहानह व फर्त अवातिफ़ खुस्रवानह मौजअ चिखलगांव किल्अह मज्कूर दर वज्ह इन्आम कानोजी देसाई मज्कूर

१ हे मुतमर्द लोक कोण ?

मेहेमत फर्मूदह दहानीदह शुदह अस्त मी बायद कह देह मज्कूर मअ कुल-बाब व कुल-वजूहात दुन्बालह नुमायन्द बअद ऊ बअवलाद व अहफाद ऊ रवां दारन्द तअ्लीक नविश्तह गिरफ्तह अस्ल फर्मान बाझ दहन्द बर हुक्म फर्मान अश्रफ स्वन्द तहरीरन फी-अत-तारीख ६ शहर जमादी-उस-सानी सनह १०४७[1] [.२ फा. शि*. ]

[समासांत*]पर्वानगी हुजूर अश्रफ अक्दस हुमायून अअला बाअलाम स्वान आली-शान सआदत-निशान रफीअ-उल-कद्र बुलन्द-मकान इख्लासखान वझीर हुकूमत[2]

९

| | | |
|---|---|---|
| ले. ४२ सु. १०३८<br>हि. १०४७ रमजान ३० | हू-अल-खलील.<br>अल्मुल्कुलिल्लह | श. १५५९ फाल्गुन शुद्ध १<br>इ. १६३८ फेब्रुवारी ५ |

[ फा. शि.* ]

फर्मान हुमायून शर्फ सुदूर याफ्त बजानिब आमिलान व देसायान किल्अह रोहिरह आंकह अझ शुहूर सनह समान व सलासीन अल्फ दर्रीं वला बद्र्गाह मुअल्ला रोशान गर्दीद कह मौज़अ कोर्लेह व मौज़अ ऊर्तन्वी व मौज़अ तितेघर किल्अह मज्कूर बाबत गन्गाजी देसाई

१ या फर्मानाचा तर्जुमा म्हणजे राजवाडे खंड १५ ले. ३३३ होय. पण तेथें लेखांकाची तारीख चुकली आहे. शि. च. सा. ले. २१२ त हें फर्मान पोटपत्र म्हणून आलें आहे. पण त्यांत तत्कालीन लेखकानें केलेल्या चुका फार आहेत.

या फर्मानाच्या तारखेबद्दल विनाकारण घोटाळा उडाला आहे. शिवचरित्र साहित्य खं. ३ ले. ५७९ व 'रामदास रामदासी' अंक १२१ 'श्री ऐतिहासिक कागदपत्रें' पृष्ठ ७ व १३ या तिन्ही ठिकाणीं जमादिलाखर ६ ही तारीख स्पष्ट आहे. या फर्मानांतही तीच तारीख आहे. असें असता वरील मासिकाचे संपादक 'जमादिलावल हा महिना बरोबर असावा' असें म्हणतात ( सदर मासिक अंक १२१ पृ. १० ). राजवाडे खंड १५ ले. ३३३ मध्यें ६ जमादिलोवल असें आहे. पण तें रूपांतर करणाराच्या हातून चुकीनें पडलें असावें असें दिसतें. रामदास रामदासीच्या १३ व्या पृष्ठावर जो कागद छापला आहे त्याची तारीखही संपादकांकडून चुकीची पडली आहे. फर्मानाचें भाषांतर करणारानेंही घोटाळा केला आहे.

२ ले. ४१, ४५, ४६ यांच्या पाठीवरील शेऱ्यांसाठीं शिवाजी निबंधावली भाग २ पृ. ७२ पहा.

